
वारकरी पंथाचा
इतिहास
लेखक
ह.भ.प. प्रा. शं.वा. दांडेकर
एम.ए.

# पांडुरंगाष्टकम्

महायोगपीठे तटे भीमरथ्या वरं पुंडरीकाय दातुं मुनींद्रैः ।
समागत्य तिष्ठन्तमानंदकंदं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥१॥

तडिद्वाससं नीलमेघावभासं रमामंदिरं सुंदरं चित्प्रकाशम् ।
वरं त्विष्टिकायां समन्यस्तपादं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥२॥

प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां नितंबः कराभ्यां धृतो येन तस्मात् ।
विधातुर्वसत्यै धृतो नाभिकोशः परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥३॥

स्फुरत्कौस्तुभालंकृतं कंठदेशे श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासम् ।
शिवं शान्तमीड्यं वरं लोकपालं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥४॥

शरच्चंद्रबिंबाननं चारुहासं लसत्कुंडलाक्रान्तगंडस्थलांगम् ।
जपारागबिंबाधरं कंजनेत्रं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥५॥

किरीटोज्वलत्सर्वदिक्प्रान्तभागं सुरैरर्चितं दिव्यरत्नैरनर्घ्यैः ।
त्रिभंगाकृतिं बर्हमाल्यावतंसं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥६॥

विभुं वेणुनादं चरन्तं दुरन्तं स्वयं लीलया गोपवेषं दधानम् ।
गवां वृंदकानन्दनं चारुहासं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥७॥

अजं रुक्मिणीप्राणसंजीवनं तं परं धाम कैवल्यमेकं तुरीयम् ।
प्रसन्नं प्रसन्नार्तिहं देवदेवं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥८॥

---

रामकृष्णहरि

वारकरी प्रकाशन मंडळ, नागपूर

# वारकरी पंथाचा इतिहास

ज्ञानदेव! तुकाराम!



: लेखक :

ह. भ. प. प्रा. शं. वा. दांडेकर, एम्. ए.



किंमत वीस रुपये

ज्येष्ठ व॥ ७
शके १९१६

दिनांक ३० जून
सन १९९४

: प्रकाशक :
ह. भ. प. अमृतमहाराज कहाळे,
वारकरी प्रकाशन मंडळ,
ज्ञानेश्वर मंदीर,
जुनी मंगळवारी, नागपूर



सुधारून वाढविलेली आवृत्ती



: मुद्रक :
रा. गो. पाटील
ज्ञानेश्वरी प्रेस
१४५७ शुक्रवार पेठ, पुणे २

# लेखकाचे दोन शब्द

बरोबर तीस वर्षांनी या लहानशा पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढण्याचा योग येत आहे. पाहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत ' या पंथाचा समग्र इतिहास सविस्तरपणे लिहिणे झाल्यास तो एक तीन चारशे पानांचा ग्रंथच होईल व तसा एक ग्रंथ लिहिण्याचा प्रस्तुत लेखकाचा विचारही आहे ' असे म्हटले होते. पण पहिली आवृत्ति निघून तीस वर्षे झाली तरी तो तसा ग्रंथ लेखकाकडून लिहून झाला नाही. तेव्हा ' लिहिण्याचा विचार आहे ' हे पूर्वीचे म्हणणेसुद्धा नवीन आवृत्ति छापतांना योग्य होणार नाही. पण पूर्वीची प्रस्तावना जशीच्या तशी छापणे अवश्य म्हणूनच या ओळी पुनः छापल्या आहेत.

मोठे पुस्तक नाही तर नाही, निदान पूर्वीच्याची तरी पुनः आवृत्ति काढावी असा स्नेही मंडळींनी आग्रह केल्यावरून पूर्वीच्या लहानशाच पुस्तकाची पण थोडीशी सुधारून ही आवृत्ति काढली जात आहे. गेल्या तीस वर्षांतील संशोधनाचा उपयोग करून काही अधिक माहिती यात दिली आहे. थोडी नवीन मते देऊन त्यांची चर्चाही केली आहे. पण पुस्तकाचा मूळ हेतु ' छोटेसे मार्गदर्शन ' एवढाच असल्याने या पंथातील तत्त्वज्ञानाची खोल चर्चा, इतर पंथांशी त्याची तुलना वगैरे गोष्टींचा विचार यात केला नाही. वारकरी पंथाचे ' ओझरते दर्शन ' होईल एवढी मात्र काळजी घेतली आहे.

या पुस्तकात अभंगाचे जे आकडे दिले आहेत ते आवटेकृत सकल संतगाथा, आवृत्ति दुसरीमधील आहेत.

ही आवृत्ति तयार करीत असताना लेखकास पुष्कळांचे सहाय्य झाले. या सर्वांचा लेखक ऋणी आहे.

पुणे, कार्तिक शु॥, ११ शके १८७९ — शं. वा. दांडेकर

# मनोगत

श्री. वै. ह. भ. प. शं. वा. दांडेकर तथा मामासाहेब यांचा छोटासा वारकरी पंथाचा इतिहास प्रसिद्ध करतांना आमच्या मंडळास आनंद होत आहे. गुरुवर्यांचेच ग्रंथ प्रकाशनाचा आजपर्यंत योग आला, बरेच वर्ष या वारकरी पंथाचा इतिहास या पुस्तकाची मागणी वारकरी मंडळीत होत होती. त्या दृष्टीने मंडळ पुनंर-मुद्रणाच काम करीत आहेत. या ग्रंथाची छपाई करण्याकरिता वै. मामाचे पुतणे श्री. बापूसाहेब दांडेकर पालघर यांनी परवानगी दिली म्हणूनच हे शक्य झाले आहे.

पुस्तकात थोडक्यात वारकरी पंथाचा इतिहास दिलाच आहे तसेच पालख्यांची माहीती आहे. त्याचप्रमाणे नवीन माहिती म्हणजे श्रीज्ञानेश्वर माउलीच्या पालखीबरोबर ज्या दिंड्या आहेत त्याची नामावली दिली तसेच महाराष्ट्रातून आणखी काही दिंड्या येतात त्याचा नामनिर्देश केला आहे, लोकांना माहिती व्हावी म्हणून पंथाची माहिती, पंथ कसा आहे, त्याची आचार संहिता काय आहे, त्याचे लोण जनता जनार्दनापर्यंत जावे हाच उद्देश आहे.

या प्रकाशनाच्या कामास आमच्या मंडळाचे सदस्य श्री. ह. भ. प. नानाबोवा कोठेकर, आळंदी यांनी या कामास मोलाची मदत केली आहे त्यांच्यामुळेच हा योग घडून आला आहे. तसेच हा ग्रंथ लवकर छापून देण्याचे कामी श्री. विठ्ठलराव पाटील, पुणे यांनी व त्यांचे सहकारी यांनी मदत केली. मुखपृष्ठाची सजावट श्री. खाजगीवाले हे. गु. मामाचे प्रेमातीलच, त्यांनी उत्तम प्रकारे मुखपृष्ठ करून दिले आहे. काही लोकांनी मदत केली त्यांचा नामनिर्देश पण नको त्यांचे ऋण आमच्या मंडळावर आहे त्या ऋणातून आम्ही उतराई होऊ शकणार नाही तसेच थोरा-मोठ्यांच्या आशिर्वादाने आज आम्ही ग्रंथ प्रकाशित करू शकलो. जनत जनार्दनांनी या ग्रंथाचा फायदा घ्यावा व ग्रंथ संग्रही ठेवावा ही मंडळाची विनंती.

वारकरी प्रकाशन मंडळ, नागपूर

अध्यक्ष, अमृतमहाराज कहाळे, नरखेडकर

# विषयानुक्रमणिका



श्री पांडुरंग - पंढरपूर,



▲ ज्ञानेश्वर महाराज समाधी - क्षेत्र आळंदी

▼ पालखी सोहळा



प.पू. जोगमहाराजांचे समाधीजवळ
▼ ह.भ.प.प्रा. मामासाहेब दांडेकर



॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

# वारकरी पंथाचा इतिहास

## १. वारकरी शब्दाचा अर्थ

महाराष्ट्रात वैदिकधर्मांतर्गत जे हल्ली अनेक पंथ आहेत त्यापैकी ज्याने महाराष्ट्राचा बराचसा भाग व्यापला आहे असा हा पंथ आहे. ज्या पंथाचा इतिहास आम्ही सांगणार आहोत तो पंथ त्या लोकांचा आहे की जे भीमा नदीच्या काठी असणारे जे पंढरपूर क्षेत्र तेथील मुख्य दैवत जे श्रीपांडुरंग त्याच्या दर्शनास नियमाने जातात. त्यांना वारकरी म्हणतात. त्यांचा हा पंथ होय.

मूळ वारकरी शब्द हा 'वारीकरी' या शब्दाचा अपभ्रंश असावा. जुन्या वाङमयात 'वारी' हा शब्द 'येरझारा' या अर्थाने वापरलेला आढळतो. आजसुद्धा तो 'वारी' म्हणजे यात्रा याच अर्थाने 'पंढरपूरची वारी', 'जेजुरीची वारी' इत्यादि शब्दप्रयोगात उपयोगिलेला आढळतो. ज्ञानेश्वर महाराजांच्या काळी 'वारी' हा शब्द 'येरझारा' या अर्थानेच वापरत असत. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरीत व ज्ञानेश्वर महाराजांच्या अभंगात 'वारी' शब्द याच अर्थाने उपयोगात आणलेला आढळतो :–

**म्हणौनि काम वैरी । जाला जेथ ठाणोरी ।**
**तेथ सरली वारी । क्रोधाची ही ॥** ज्ञाने. १८–१०६१

ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वारी ।
सुखें धृतीचिया धवळारी । बुद्धि नांदे ।। ज्ञाने. १६–३७७

• ० ०

आणि विकारांची जे वारी । ते विपरीत ज्ञानाची परी ।
नेणिजे जिये माझारी । ते सुषुप्ति गा हा ।। ज्ञाने. १५–५२१

पुढील कडव्यात तर ज्ञानेश्वर महाराज वारकऱ्याचे अंतर्लक्षणच सांगत आहेत असे म्हणावयास हरकत नाही.

काया वाचा मनें जीवें सर्वस्वें उदार ।
बापरखुमादेवीवरा विठ्ठलाचा वारीकर ।। ज्ञा. म. ९३

तात्पर्य, वर्षांतून आषाढी, कार्तिकी, माघी अथवा चैत्री यांपैकी एका शुद्ध एकादशीस गळयात तुळशीची माळ घालून नियमाने जो पंढरपूरास जातो तो, 'पंढरपूरचा वारकरी' म्हटला जातो व त्याच्या उपासनेचा जो मार्ग तो 'वारकरी पंथ' होय. वारकऱ्यांच्या-पैकी मोठा वर्ग आषाढी व कार्तिकी या दोन वाऱ्या करतो. माघी व चैत्री या वाऱ्यांना जाणारा वर्ग कमी.

वास्तविक वारकरी या शब्दाचा अर्थ नियमाने उपास्यदैवता-कडे जाणारा एवढाच आहे; व दर महिन्यास, पंधरवाडयास किंवा आठवडयास आपल्या उपास्यदैवताकडे जाऊन अशी उपासना करणारे उपासक महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरही पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ, जेजुरीच्या खंडोबाच्या वारीस अथवा गुजराथमध्ये डाकोरनाथाच्या वारीस जाणारे पुष्कळ लोक आहेत. व्यापक अर्थाने या सर्वांना वारकरी म्हणता येईल. परंतु वारकरी या शब्दाला असा विशिष्ट अर्थ येऊन बसला आहे की वारकरी म्हटला म्हणजे 'पंढरपूरचाच वारकरी' समजला जातो. अशा वारकरी शब्दाच्या उपयोगास दृष्टांतच द्यावयाचा झाला तर

तो 'वेदांत' या शब्दाचा देता येईल. वेदांतदर्शन म्हटले म्हणजे मूळ अर्थाने त्यात शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य प्रभृति सर्व आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा समावेश होणे अवश्य आहे. कारण 'वेदांत' या शब्दाचा अर्थ उपनिषदांना प्रमाण मानून चालणारे दर्शन ('वेदान्तो नाम उपनिषत् प्रमाणम्') असा आहे. पण ह्या सर्व आचार्यांच्या तत्त्वज्ञानात श्रीमद् शंकराचार्य यांच्या तत्त्वज्ञानाला असे महनीय पद प्राप्त झाले आहे की 'वेदांत' शब्द उच्चारला म्हणजे सामान्य मनुष्य शंकराचार्यांचेच अद्वैत तत्त्वज्ञान असे समजतो. तसेच वारकरी या शब्दाचेहि झाले आहे. वर म्हटल्याप्रमाणे व्यापक अर्थाने जरी वारकरी हा शब्द जेजुरी, डाकोर, गाणगापूर इत्यादि क्षेत्रांना नियमितपणे जाणाऱ्यास लावता येईल तरीपण पंढरपूरच्या वारकरी पंथास महाराष्ट्रामध्ये असे महनीय स्थान त्यातील होऊन गेलेल्या श्रीज्ञानदेव-तुकारामादि संतांच्या कार्यामुळे प्राप्त झाले आहे की 'वारकरी' हा शब्द उच्चारला म्हणजे सामान्य मनुष्य 'पंढरपूरचा वारकरी' असाच त्या शब्दाचा अर्थ घेतो व हा समज योग्यही आहे. कारण, प्रतिवर्षी पंढरपूरास जेवढी यात्रा भरते एवढी यात्रा दरवर्षी महाराष्ट्रात दुसरीकडे कोठेच भरत नाही. शेवटी जो यात्रेच्या माहितीचा तक्ता दिला आहे त्यावरून कळून येईल की पंढरपूरात नुसत्या आषाढीला दोन-चार लाख लोक जमतात व सर्व वाऱ्यांना मिळून जवळ जवळ साडे सहा लाख लोक जमतात. विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे की बृहन्महाराष्ट्राच्या (मराठवाडा, विदर्भ, नागपूर, मुंबई इत्यादि) सर्व भागातून तर वारकरी येतातच; पण कर्नाटक, गुजराथ, मद्रास, बंगलोर, इंदूर वगैरे भागातूनहि वारकरी येतात. महाराष्ट्रापुरतेच बोलावयाचे तर

कोकण सोडून दिल्यास महाराष्ट्रातील असे एकही मोठे गाव सापडणार नाही की ज्यात वारकरी नाही व ही सर्व पुण्याई ज्ञानोबातुकोबांची आहे.

----

## २. माळकरी पंथ अथवा भागवत धर्म

वारकरी पंथास 'माळकरी पंथ' अथवा 'भागवत धर्म' असेही म्हणण्याचा प्रघात आहे. या पंथास माळकरी पंथ हे नाव वारकऱ्यांचे मुख्य बाह्य चिन्ह जी तुळशीच्या मण्यांची माळ तिजवरून पडले आहे. ज्याप्रमाणे यज्ञोपवीतावाचून ब्राह्मण होणार नाही त्याप्रमाणे तुळशीच्या माळेवाचून वारकरी होऊच शकत नाही. इतके महत्त्व या पंथात तुळशीची माळ गळ्यात धारण करणे या गोष्टीस आहे. मुद्रा लावणे, भगवी पताका धारण करणे इत्यादि वारकऱ्यांची बाहय चिन्हे म्हणून सांगितली जातात. पण या सर्वांत पंढरपूरची नियमाने वारी करण्याइतकेच ज्या गोष्टीला महत्त्व आहे ती म्हणजे गळ्यात तुळशीची माळ धारण करणे ही होय. त्याचे कारण असे आहे की वारकरी हा श्रीविठ्ठलाचा उपासक आहे व श्रीविठ्ठल म्हणजे भगवान् श्रीकृष्णाचे बाळस्वरूप आहे. याप्रमाणे वारकरी हा विठ्ठलभक्त म्हणजे कृष्णभक्तच असल्याने श्रीकृष्णास म्हणजे श्रीविठ्ठलास प्रिय असणारी तुळशीची माळ यालाही प्रिय आहे व ती तो आपल्या उपास्यदैवतावरील प्रेमाचे निदर्शक म्हणून धारण करतो. ही माळ तुळशीच्या काष्ठाच्या मण्यांची असते, तिचे १०८ मणी असतात व मध्ये मेरु असतो.

गळ्यात माळ धारण करणे हा सुद्धा उपासनेच्या साधनांतील एक भाग आहे. शैव हे रुद्राक्षाची माळ धारण करतात. गाणपत्य हे पोवळ्याची माळ धारण करतात. काही शाक्त हे कवड्याची माळ धारण करतात. या दृष्टीने हे सर्व लोक माळकरीच आहेत. पण वारकरी पंथात ‘ गळ्यात माळ घालणे ’ याला अनन्यसाधारण असे महत्त्व आहे. शैव, गाणपत्य, शाक्त हेहि माळ धारण करतात. पण ती जपापुरतीच. तिचे काम झाले म्हणजे ते ती आवडेल तर गळ्यात ठेवतात किंवा वेगळी बाहेर काढून ठेवतात. पण वारकरी पंथात एकदा गळ्यात माळ घातली म्हणजे ती केव्हाही काढता येत नाही. ती त्याच्याबरोबरच जावयाची. जर ती तुटली तर सांप्रदायिक वारकरी हा ती गाठून पुनः गळ्यात घातल्याशिवाय अन्न ग्रहण करणार नाही. या कारणाकरिताच वर आम्ही तिला यज्ञोपवीताची उपमा दिली आहे. पण खरे सांगावयाचे तर यज्ञोपवीताचा दृष्टान्तही कमीच आहे कारण यज्ञोपवीत हे संन्यास घेऊन टाकता येते ! माळ मात्र एकदा गळ्यात घातली की ती धारण करणाऱ्याबरोबरच जाते. ती धारण करणारा कोणत्याही आश्रमात असला तरी त्याच्याबरोबर ती राहतेच. ती केव्हाच काढावयाची नसते. अशारीतीने गळ्यात तुळशीची माळ धारण करणे हे वारकऱ्याचे जवळ जवळ व्यावर्तक बाह्यलक्षण असल्याने या पंथास ‘ माळकरी पंथ ’ असेही म्हणतात.

आता ह्यास ‘ भागवत धर्म ’ असेही म्हणतात असे वर म्हटले आहे. पण हा भागवतधर्म श्रीमद् शंकराचार्य यांनी आपल्या शारीरभाष्यात (ब्र. सू. शांकरभाष्य २-२-४२-४६) ज्याचे खंडन केले तो भागवतधर्म हे दोन अगदी भिन्न पंथ आहेत. आचार्यखंडित भागवतधर्मांत ‘ वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व

अनिरुद्ध ' ही चतुर्व्यूह कल्पना प्रमुख आहे व तो द्वैती आहे. उलट-पक्षी वारकरी पंथ हा जरी भक्तिप्रधान असला तरी निःसंशय अद्वैतमतांचाच पुरस्कर्ता आहे व त्यात व्यूहकल्पनेचा यत्किंचितहि मागमूस नाही.

ह्यास 'भागवत संप्रदाय' म्हणतात याचे मुख्य कारण हा 'वैष्णव संप्रदाय' आहे. या पंथाचे उपास्य दैवत श्रीपांडुरंग हे श्रीकृष्णाचे बाळरूप आहे हे वर सांगितलेच आहे. पंढरपूरास दक्षिण द्वारका असे जे म्हणतात तेही याचेच निदर्शक आहे.

**पावन पांडुरंगक्षिति । जे कां दक्षिणद्वारावती ।**
**जेथ विराजे श्रीविठ्ठलमुर्ती । नामे गर्जती पंढरी ।।** ए.भा. २९-२४३

तात्पर्य, द्वारकाधीश श्रीकृष्ण परमात्म्याचे बाळरूप हे उपास्य दैवत असल्यामुळे हा वैष्णव संप्रदाय आहे. अर्थात् श्रीहरीच्या लीला ज्यात वर्णन केल्या आहेत तो श्रीमद् व्यासकृत द्वादशस्कंधी भागवत ग्रंथ भगवद्गीतेप्रमाणेच वारकरी पंथास पूज्य आहे.

**गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचे ।।** तु. म. ३३५७

भागवतातील द्वादशस्कंधापैकी एकादशस्कंध संपूर्ण व द्वितीय स्कंध अध्याय ९ यावर पैठणचे श्रीएकनाथ महाराज यांच्या ओवीबद्ध मराठीत टीका आहेत. त्या अनुक्रमे 'नाथभागवत' व 'चतुःश्लोकी भागवत' या नावाने प्रसिद्ध आहेत. या दोन्ही ग्रंथास वारकरी प्रमाणभूत समजतात.

शिवाय सगुणोपासना, नामस्मरण, हरिकीर्तन, गुरुकृपा, सर्वात्मभाव, आत्मसमर्पण ही एकादश स्कंध अध्याय दोनमध्ये भागवत श्रेष्ठाची जी लक्षणे सांगितली आहेत त्याच अंगाने वारकऱ्याची

साधना बनलेली आहे. त्याच मार्गाने वारकरी आपले इष्ट साध्य करून घेत असतो. म्हणून ह्यास 'भागवतधर्म' असे म्हणतात.

येथवर वारकरी या शब्दाचा अर्थ व वारकऱ्याचे मुख्य लक्षण याचा विचार सांगितला. आता त्याच्या इतिहासाकडे वळू.

----

# ३. काल – आरंभ व वाढ

## वेद व वारकरी पंथ

वारकरी पंथ हा वैदिक धर्मांतर्गत एक पंथ आहे हे आरंभी सांगितलेच आहे. कित्येकांच्या मते ज्या वारकरी पंथातील साधूंनी हा वारकरी पंथ स्थापला त्यांचा हा पंथ स्थापन करण्यात वैदिक धर्माविरुद्ध बंड पुकारून त्यात क्रांति घडवून आणण्याचा हेतु होता. जसें बौद्ध अथवा जैन धर्म हे 'वेदविरुद्ध' धर्म आहेत तसाच वारकरी पंथही आहे असे या लोकांचे मत आहे. पण वास्तविक स्थिति अगदी वेगळी आहे. वारकरी पंथ हा वैदिक-धर्माविरुद्ध बंड नसून त्याची तो एक शाखा आहे व तो मूळच्या धर्मास 'उजळा' देण्याकरिता जन्मास आला आहे.

आम्ही हे जे म्हणतो त्याला या पंथातील मान्य अशा अधि-कारी साधूंची वचने प्रमाण म्हणून देता येतीलच. पण पुढील एक गोष्ट लक्षात ठेवली तरी पुरे की वारकरी पंथ हा एवढा मोठा पंथ असूनही आपल्या उत्पादकाच्या नावावर तो मोडत नाही. यावरून एक गोष्ट स्पष्ट होणारी आहे ती ही की वारकरी पंथाने वैदिक धर्माविरूद्ध बंड केव्हाही पुकारले नाही व हा पंथ आपल्या मूळच्या स्वरूपात फारसा फरक न करता आपली

वाढ करणारा असा आहे. जशी एखादी फांदी मूळच्या वृक्षाच्या बुंध्यापासून इतक्या सूक्ष्मरीतीने भिन्न होत जाते की ती फांदी ज्यावेळेस बरीच फोफावते त्यावेळेसच मालकाचे लक्ष तिजकडे जाते. तोपर्यंत हिचे मूळ कोठे व ते कसे निघाले याचा त्यास पत्ताही नसतो. वारकरी पंथाचीहि थोडी तशीच स्थिति झालेली आहे. या पंथातील संतांनी वेदाचे प्रामाण्य मान्य केले व आपण जी शिकवणूक शिकवतो ती वैदिक शिकवणूक आहे व जो वेदशास्त्रादिकांना प्रमाण मानत नाही तो पाखंडी आहे असे ठिकठिकाणी सांगितले आहे. याविषयींची त्यांची काही प्रमाणे पुढे देतो :–

याकारणें पैं बापा । जया आथी आपली कृपा ।
तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ।। ज्ञाने. १६–४५५

० ० ०

पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती ।
नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ।। ज्ञाने. १६–४६२

० ० ०

नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढें बंड ।
तें देखोनि पाषांड । आनचि वाजे ।। ज्ञाने. १३–१९

० ० ०

वेदमार्गें मुनि गेले त्याचि मार्गें चालिलों ।
न कळेचि विषयअंधा म्हणोनि उघड बोलिलों ।
चालतां धनुर्धरा तरंगाकारी हारपलों ।
ज्ञानदेवो निवृत्तीचा द्वैत सर्व निरसलों ।। ज्ञा. म. ७४६

० ० ०

आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ।
बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ।।१।।
झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ।।२।। तु. म. ३५१९

उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाडा ॥ तु. म. ४१७७

० ० ०

वाचा बोलों वेदनीती । करूं संतीं केलें तें ॥ तु. म. ९४९

० ० ०

मातेचि जो थाने फाडी । तया जोडी कोण ते ॥१॥
वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकिया खळ ॥२॥ तु. म. २८०४

० ० ०

वेदशास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचे वदन नावलोका ॥ तु. म. २७७७

तात्पर्य, वैदिक धर्मास उजळा देणाराच हा पंथ असल्याने याचा आरंभ केव्हा झाला हे शोधण्याकडे कोणाचेच लक्ष वेधले नाही व आज अशी स्थिति आहे की या पंथाचा आरंभ अमक्या शकापासून झाला असे निश्चित सांगता येत नाही. यावरून एवढेच सिद्ध होते की हा पंथ मूळ वेदास चिकटून राहणारा व बराच पुरातन असला पाहिजे.

वारकरी पंथाचा इतिहास सांगतांना सोयीकरिता त्याचे खालील भाग पाडल्यास तत्संबंधी विचार करण्यास सोपे जाणार आहे.

(१) आरंभाचा अथवा श्रीज्ञानदेवांच्या पूर्वीचा काल.
(२) श्रीज्ञानदेव व नामदेव यांचा काल.
(३) श्रीभानुदास व एकनाथ यांचा काल.
(४) श्रीतुकोबा व निळोबा यांचा काल.
(५) तदनंतरचा तीनशे वर्षांचा काल.

## १. आरंभाचा अथवा श्रीज्ञानदेवांच्या पूर्वीचा काल

या पंथाची सुस्पष्ट अशी माहिती श्रीज्ञानदेवांच्या कालानंतरची मिळते. तत्पूर्वीचा म्हणजे आरंभीच्या काळाचा इतिहास निश्चित-

पणे सांगता येईल अशी सामुग्री अजूनही हाती आलेली नाही. तो इतिहास निश्चित करण्याकरिता पुढील गोष्टींचा निर्णय होणे अवश्य आहे–

(अ) वारकरी पंथाचे उपास्य दैवत जी पांडुरंगमूर्ति हिचा काल.

(आ) ज्या पुंडलीक भक्ताकरिता श्रीपांडुरंग आले त्याचा काल.

(इ) व ज्या पंढरपूर क्षेत्रात श्रीपांडुरंग पुंडलीकाकरिता विटेवर येऊन उभे राहिले त्या क्षेत्राचा इतिहास.

येथे एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवणे अवश्य आहे की या सर्व गोष्टीसंबंधाने जरी निश्चित माहिती मिळाली तरीसुद्धा वारकरी पंथाचा उगम केव्हा झाला हे निश्चित ठरवता येईलच असे नाही. कारण, विठ्ठलभक्ति आणि वारकरी पंथ ह्या दोन गोष्टी एकच नाहीत. वारकरी हा विठ्ठलाचा भक्त असतो हे खरे, पण प्रत्येक विठ्ठलभक्त हा वारकरी असेलच असे नाही. याविषयी अधिक चर्चा श्रीपांडुरंगमूर्तीच्या कालनिर्णयाच्या चर्चेच्यावेळी करू.

येथे एवढे सांगणे अवश्य आहे की गॅझिटियर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी, व्हॉल्यूम् २०, सोलापूर, पृष्ठ ४७१ वर जी माहिती पंढरपूर व वारकरी या संबंधाने प्रसिद्धी झाली आहे तीत 'या पंथास तेराव्या शतकाच्या शेवटी होऊन गेलेले जे श्रीज्ञानदेव यांनी आरंभ केला' असे जे विधान केले आहे ते चुकीचे आहे. कदाचित् हे विधान तुकाराम महाराजांचा म्हणून जो पुढील अभंग प्रसिद्ध आहे त्यावरून केलेले असेल.

**संतकृपा झाली । इमारत फळा आली ।। १ ।।**

ज्ञानदेवें रचिला पाया । रचियेलें देवालया ॥२॥
नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥३॥
जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥४॥
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ॥५॥ तु. म. ४१९८

वास्तविक वरील अभंग बहिणाबाईचा आहे. या अभंगांत तिने वारकरी पंथरूपी मंदिराच्या वाढीचा इतिहास फारच सुंदररीतीनें वर्णन केला आहे. परंतु त्यातील 'रचिला पाया' याचा अर्थ श्रीज्ञानदेवांनीच या पंथाचा आरंभ केला असा नव्हे. श्रीतुकाराम महाराज यांनी श्रीज्ञानदेवांची योग्यता व कार्य ही ज्या अभंगात सांगितली आहेत त्यात ते म्हणतात :–

जयानें घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ तु.म.३८४१

या कडव्यात तुकाराम महाराज ज्ञानदेवांनी वैष्णवांची संघटना केली असे म्हणतात आणि हेच वस्तुस्थितीस धरून आहे. श्री ज्ञानदेव यांच्या कालाच्याही पूर्वी वारकरी भक्त होते व पंढरपूर क्षेत्रात मोठी यात्रा भरत होती हे नामदेवरायांनी दिलेल्या त्यांच्या वडिलांच्या हकीकतीवरून स्पष्ट होणार आहे. नामदेवराय म्हण-तात की विठ्ठलपंत व रुक्मिणी यांचा विवाह झाल्यावर त्या वधु-वरांस आपल्या कुलदैवताच्या पाया पडण्यास म्हणून शिदोपंतांनी पंढरपूरास नेले. त्यावेळेस तेथे मोठी यात्रा भरलेली होती.

कुळदेवस्मरण म्हणती सावधान । उभयतांचें मन पांडुरंगीं ॥
झाले पाणिग्रहण विधीसी अर्पण । वंदिले चरण शिदोपंतीं ॥
पंढरिये क्षेत्रा मिळालीसे यात्रा । आले पंढरपुरा भक्तराज ॥
गरुडटके पताका मृदंग वाजती । वैष्णव गर्जती जयजयकारे ॥
गरुडपारी उभे दाटी वैष्णवांची । उपमा वैकुंठीची पंढरीये ॥
राउळा भीतरी प्रवेशली दोघे । देखियले उभे पांडुरंग ॥

**काया वाचा मनीं पारुषले नयनीं । मस्तक चरणीं ठेवियेला ॥**
**विठ्ठलासी ध्यान रामकृष्णमाळा । हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ती राया ॥**
ना. म. ८८९

लग्न झाल्यानंतरही विठ्ठलपंत हे पंढरपूरची आषाढी कार्तिकीची वारी करीत असत असा नामदेवरायांनी आपल्या अभंगांत उल्लेख केलेला आहे.

**नित्य हरिकथा नामसंकीर्तन । संतांचें दरुषन सर्व काळ ॥**
**पंढरीची वारी आषाढी कार्तिकी । विठ्ठल एकाएकी सुखरूप ॥** ना. म. ९५

'पूर्वी अनंत भक्त झाले । पुढेही भविष्य बोलले ॥' वगैरे सांगूनही नामदेवांनी आपल्या अभंगात या पंथाची पुरातनता दाखविली आहे. त्यावरून ज्ञानेश्वर महाराजांच्या पूर्वीही पंढरपूरास वारकरी भक्त जमत असत हे उघड आहे.

वारकरी पंथ हा नामदेवरायांच्या पूर्वीही होता ही कल्पना दृढ करणारा नवीन पुरावा पुढे आला आहे. साधना साप्ताहिकाच्या २५ ऑगस्ट १९५६ च्या अंकात श्री. पांडुरंग देसाई यांनी वारकरी पंथाची प्राचीनता त्यांना धारवाडजवळ हेब्बळी गावी सापडलेल्या इ. स. १२४८ (शके ११७०) मधील शिलालेखावरून चांगली सिद्ध केली आहे. हा शिलालेख कानडी आहे व देवगिरीच्या कृष्णराजाचा आहे. यातील दोन कानडी ओळीचे मराठी भाषांतर असे आहे, 'श्रीपंडरंगेच्या श्रीविठ्ठलदेवाच्या वारीच्या श्रीहरिदिनी धर्म चालावा म्हणून कलुवर सिंगगावुंडाने एक वृत्ति दिली.'

हा नवीन संशोधिला गेलेला शिलालेख विठ्ठलभक्तीच्या इतिहासाच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. वारीचा संप्रदाय बाराव्या शतकाइतका तरी प्राचीन आहे असे आज निश्चित दिसते.

श्रीज्ञानदेवांनी या विखुरलेल्या वारकरी भक्तांची आपल्या सामर्थ्याने संघटना केली आणि श्रीज्ञानदेवी लिहून या पंथास सुव्यवस्थितता आणली. अशारीतीने या पंथाची संघटना करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होता व म्हणूनच बहिणाबाईने ‘ज्ञानदेवें रचिला पाया’ असे म्हटले असावे. तात्पर्य, हा पंथ श्रीज्ञानदेव-नामदेव यांच्या पूर्वी होता एवढीच गोष्ट आतापर्यंत निश्चित झाली आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

(अ) **श्री पांडुरंगमूर्तीचा काल** :– वारकरी पंथातील प्रमुख गोष्ट म्हणजे श्रीपंढरीनाथाची वारी ही होय. अर्थात् श्रीपंढरीनाथाच्या मूर्तीचा इतिहास जसा मिळेल त्यावर वारकरी पंथाच्या मूळाचा इतिहास बराचसा अवलंबून आहे. पण हा इतिहास पुंडलीकाच्या कालावरही अवलंबून आहे. कारण, नरसिंह अवतार जसा श्रीप्रल्हादाकरिता, तसाच हा श्रीविठ्ठल अवतार पितृसेवक जो पुंडलीक याजकरिता आहे. भगवान् श्रीकृष्ण हे पुंडलीकाच्या सेवेने संतुष्ट होऊन त्याजकरिता पंढरीस आले व विटेवर उभे राहिले ही गोष्ट सकल संतास मान्य आहे.

देव पंढरपूरास वैकुंठातून, गोकुळातून का द्वारकेहून आले याबाबत वेगवेगळी प्रमाणे सांपडतील. पण ते पुंडलीकाकरिता पंढरीस आले ही गोष्ट सर्व संतांनी सारखीच सांगितली आहे :–

**उदार चक्रवर्ती । वैकुंठीचा भूपति ।**
**पुंडलीकाचिया प्रीती । विटे उभा राहिला ॥** तु. म. ३०१

० ० ०

**वैकुंठीचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥** तु म. ३०४

० ० ०

**पुंडलीकाच्या भावार्था । गोकुळींहुनी जाला येता ।**
**निजप्रेमभक्ती भवतां । घ्या आतां म्हणतसे ॥** ज्ञा. म. १८४

**द्वारकेचें केणें आलें याचि ठाया। पुढें भक्तराया चोजवीत ॥** तु. म. ३६६

त्याचप्रमाणे देव पंढरपुरास रुक्मिणीसहित आले, गाई गोपाळ घेऊन आले का एकटे उघडे आले यात भेद असेल, परंतु ते पुंडलीकाकरिता पंढरीस आले हे निश्चित.

**युगें अठ्ठावीस विटेवरी उभा। वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥**
**पुंडलीका भेटी परब्रह्म आलें गा। चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥**

ना. म. ३६६

**नागर गोडे बाळरूप। तें स्वरूप काळीचें ॥ १ ॥**
**गाई गोपाळांच्या संगें। आले लागे पुंडलीका ॥** २ ॥ तु. म. ३०२

° • °

**नेणो विठो मार्ग चुकले। उघडे पंढरपुरा आले।**
**भक्तें पुंडलीकें देखिलें। उभे केलें विटेवरी ॥** ज्ञा. म. ८९

शिवाय वारकऱ्यांची शांति –पुंडलीकवरदा हरि विठ्ठल, जिची उद्‌घोषणा भजनात व कीर्तनात करतात ती–पुंडलीकाकरिता देव आले हेच दाखवते. गॅझिटिअरमधील माहिती देणाऱ्या लेखकाने या घोषणेचा अर्थ 'हे पुंडलीका, वर दे हरि विठ्ठल' असा केला आहे. हा अर्थ कोणाहि वारकऱ्यास मान्य नाही. वास्तविक हिचा अर्थ 'पुंडलीकाला वर देणाऱ्या हे हरि विठ्ठला !' असा संबोधन-स्वरूपाचा आहे.

वारकरी पंथाचा इतिहास हा वारकऱ्यांचे उपास्य दैवत जे 'श्रीपांडुरंग' त्याच्या मूर्तीच्या इतिहासाशी निगडित असावा हे अगदी स्वाभाविक आहे. कारण, वारकऱ्यांची उपासना अथवा साधना श्रीपांडुरंगाभोवती केंद्रीभूत झालेली आहे. परंतु यामुळे सामान्य मनुष्य वारकरी पंथाचा इतिहास व मूर्तीचा इतिहास यांचा जो संबंध मनाने जोडील तितका संबंध दोहोंचा नाही, ही अत्यंत महत्त्वाची

गोष्ट वारकरी पंथाचा इतिहास बघतांना लक्षात ठेवणे अवश्य आहे. कारण, विठ्ठलभक्ति वारकरी साधना ह्या दोन्ही गोष्टी एक नव्हेत. वारकरी हा विठ्ठलभक्त असतो पण प्रत्येक विठ्ठलभक्त वारकरी असेलच असे नव्हे. उदाहरणार्थ, मध्व सांप्रदायातील मंडळी ही विठ्ठलभक्त आहेत म्हणून ती वारकरी असतीलच असे म्हणता येणार नाही. शिवाय वारकरी पंथाचा इतिहास हा श्रीपांडुरंगमूर्तीभोवती केंद्रित झाला आहे ही गोष्ट खरी आहे, पण तो त्या मूर्तीच्या वारकरी पंथातील पुढारी साधूंच्या ज्या कल्पना आहेत त्या कल्पनाभोवती केंद्रीभूत आहे, नुसत्या ज्या पार्थीव घटकावयाची ती मूर्ति बनली आहे त्या घटकावयाच्या इतिहासाभोवती नव्हे.

हे सांगण्याचे कारण असे आहे की हल्ली संशोधक नवीन नवीन शोध काढू लागले आहेत. मूर्तीबाबत निःसंदिग्ध असा शोध फारच थोडा लागलेला दिसतो. पण कोणी म्हणतात की आजची मूर्ति ही शंकराचार्यांच्या वेळची नाही, कोणीतर म्हणतात की ही ज्ञानोबा तुकोबांच्या वेळचीही नाही ! या मतांचा थोडाबहुत विचार योग्य प्रसंगी करू. पण या सर्वांचा सविस्तर विचार प्रस्तुतच्या प्रसंगी करणे अशक्य आहे. कारण तो एक स्वतंत्र ग्रंथच होईल. शिवाय, या चर्चेसाठी वारकरी पंथाच्या इतिहासाच्या लेखात फार जागा अडवण्याचे कारण नाही. कारण, वर म्हटल्याप्रमाणे हा मूर्तीचा इतिहास नव्हे, हा वारकऱ्यांचा इतिहास आहे व तेवढ्यापुरताच या मूर्तीबाबत जे प्रश्न उत्पन्न केले गेले आहेत त्यांचा विचार मांडणार आहोत.

प्रथमतः श्रीपांडुरंगमूर्तीसंबंधी जो उपलब्ध पुरावा आहे त्याचा विचार करू. त्याचे चार भाग करता येतील :– (१) पौराणिक (२) अभंगीय (३) शिलालेखीय व (४) इतर.

(१) **पौराणिक**– श्रीपांडुरंग कथा ही पद्मपुराणात आहे. परंतु तेथे या मूर्तीचा काल ठरविण्यास उपयोगी पडेल अशी माहिती मिळण्यासारखी नाही.

(२) **अभंगीय**– अभंगांत जो पुरावा आहे तो पुढीलप्रमाणे :-

**(अ) युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा**

ना. म. २३६६

० ० ०

**(आ) हें नव्हें आजिकालीचें । युगें अठ्ठावीसाचें ॥** ज्ञा. म. ९०

० ० ०

**(इ) युगें झालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ॥** तु. म. ३१६

या अभंगांच्या पुराव्यावरून संतांच्या मते देव विटेवर अठ्ठावीस युगे उभे आहेत एवढेच ठरते.

नामदेवराय यांच्या आरतीत 'युगें अठ्ठावीसाच्या' ऐवजी 'उगे अठ्ठावीस' असाही पाठ तार्किक दृष्टीस पटेल असा या आरतीचा अर्थ लागावा म्हणून सुचविण्यात येतो. पण यात त्या आरतीचे एक तर सर्व स्वारस्य नाहीसे होते व दुसरे कोणताही वारकरी 'उगे अठ्ठावीस' असे म्हणताना आढळून येत नाही. अर्थात् 'उगे अठ्ठावीस' असा पाठ घेऊन चार वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे ही ज्याच्याविषयी उगी आहेत असा अर्थ करणे हे केवळ बुद्धीचे कौशल्य दाखवील एवढेच. 'युगें अठ्ठावीस' हा शब्द अष्टविंशतितमे युगे– अठ्ठाविसाव्या युगी– अशा अर्थाने वापरलेला असण्याचा संभव आहे. पंचांगाच्या प्रारंभी जी माहिती दिलेली असते तीवरून आपल्याकडील कालगणनेप्रमाणे हे वैवस्वत मनूचे अठ्ठाविसावे महायुग चालू आहे. अर्थात 'युगे' याचा अर्थ 'युगो' (युगांत) असा केल्यास वारकरी श्रद्धेस योग्य असा या आरतीचाही अर्थ

लागणे हे शक्य कोटीत येणार आहे. तात्पर्य, या अभंगीय पुराव्यावरून 'जुनाट युगादीचें नाणें। बहुता काळाचें ठेवणें।।' हे जे श्रीतुकारामबुवांनी म्हटले आहे त्यापेक्षा जास्त काही माहिती मिळत नाही.

ही पांडुरंगाची जी आरती आहे व तसेच श्रीपांडुरंगमूर्तीचे वर्णन करणारे जे साधूंचे अभंग आहेत त्यावरून अलिकडचे संशोधक नवीन नवीन इतिहास तयार करीत आहेत. त्या सर्व नवीन मतांचा विचार करणे स्थलाभावी अशक्य आहे. नमुन्याकरता म्हणून त्यातील एकाचा विचार केला म्हणजे असल्या अनुमानांना काय महत्त्व द्यावयाचे ते सूज्ञ वाचकच ठरवू शकतील. नामदेवांच्या आरतीत श्रीपांडुरंगाचे पुढीलप्रमाणे वर्णन आहे :-

**युगें अठ्ठावीस विटेवरी उभा। वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा।।**

ना. म. २३६६

आपण जर आता पंढरपुरात देवळात गेलो तर आपणास असे आढळून येईल की श्रीविठ्ठल हे एकटेच उभे आहेत. श्रीरुक्मिणीचे म्हणजे श्रीरखुमाईचे मंदिर देवाच्यापासून दूर मागे स्वतंत्र आहे. तेव्हा यावरून एका प्रसिद्ध संशोधकाने असे अनुमान काढले की ही आरती ज्यावेळी नामदेवांनी केली त्यावेळी हल्लीचे देऊळ नव्हते व ही मूर्ति नव्हती !

येथे विचार करण्यासारखी गोष्ट अशी आहे की साधुकवि ज्यावेळी आरत्या तयार करतात त्यावेळी ते प्रत्यक्ष कातड्याच्या डोळ्यांना दिसणाऱ्या गोष्टी लिहितात का त्यांना त्या स्वरूपाच्या आवडणाऱ्या-वाटणाऱ्या गोष्टी लिहितात ? या आरत्यांचा

शब्दशः अर्थ केला तर पंचाईत होईल ! कारण या आरतीतच पुढे असे म्हटले आहे की, ‘ चरणीं वाहे भीमा । ’ देवाच्या पायाजवळ भीमा वाहते. याचा असा अर्थ का करावयाचा की पूर्वी भीमेचा ओघ देवाच्या पायाजवळून होता व आता तो बदलला ? अथवा पुंड-लीकाच्या समाधीप्रमाणे देव नामदेवांच्या वेळी वाळवंटात होते ? याच्यापुढे वर्णन करतांना नामदेवराय लिहितात :–

**तुळसीमाळा गळा कर ठेवूनि कटीं । कांसे पितांबर कस्तुरी लल्लाटीं ।**
**देव सुरवर नित्य येती भेटी ।...** ना. म. २३६६

हे वर्णन प्रत्यक्षात दिसणाऱ्या मूर्तीचे धरून याच्यावरून काय अनुमान काढावयाचे ?

खरे असे आहे की आरतीत अथवा कित्येक अभंगातसुद्धा जे वर्णन आढळते ते भक्त देवाची जी मनोमय कल्पना करतो अथवा त्याचा जो अध्यात्मिक अनुभव असतो त्याचे असते. प्रत्यक्ष कात-ड्याच्या डोळ्याने दिसणाऱ्या मूर्तीशी ते जुळतेच असे नाही. उदाहरणार्थ, श्रीपांडुरंगमूर्तीचे वर्णन करणारे तुकाराम महा-राजांचे पुढील दोन अभंग पाहा :–

**राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ।। १ ।।**
**कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ।। २ ।।**
**मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतिलें सकळही ।। ३ ।।**
**कांसे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ।। ४ ।।**
**सकळही तुम्ही व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा थोर नाहीं ।। ५ ।।**
तु. म. २

• ० ०

**भीमातीरीं एक वसविलें नगर । त्याचें नाव पंढरपूर रे ।**
**तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइला सोळा हजार रे ।।** तु. म. २१३

आपण या वर्णनावरून जर असे ठरवू लागलो की ज्याअर्थी या वर्णनाशी सध्याची मूर्ति जुळत नाही त्याअर्थी आताची मूर्ति तुकोबांच्या वेळी नव्हती तर हे अनुमान चुकीचे ठरेल ! पण असेही अनुमान एका संशोधकाने काढले आहे !

हे सर्व सांगण्याचा हेतु असा की संशोधन करतांना या संतांच्या लिखाणाचा संप्रदायशुद्ध विचार करावा व मग त्यावर आपली अनुमाने वसवावीत. तसे केले नाही तर त्यांच्या शब्दावरून काढलेली अनुमाने चुकीची ठरतील.

आतापर्यंत या मूर्तीसंबंधी जे सांगितले त्याचा अर्थ एवढाच की श्रीज्ञानदेव, नामदेव, ही मूर्ति फार पुरातन आहे असे समजत होते व श्रीज्ञानदेव, नामदेव यांच्या पूर्वीही पंढरपूरास यात्रा जमत होती. त्यांच्यावेळी दोन वेळा यात्रा भरत होती असे दिसते. नामदेवराय म्हणतातः—

**आषाढी कार्तिकी विसरूं नका मज । सांगतसे गुज पांडुरंग ।** ना. म. १८०३

कालाच्या बाबतीत आपणास याहिपेक्षा थोडे मागे निश्चित-रीतीने जाता येईल. आद्य शंकराचार्य यांचे

**महायोगपीठे तटे भीमरथ्या वरं पुण्डरीकाय दातुं मुनींद्रैः ।**
**समागत्य तिष्ठन्तमानंदकंदं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥१॥**

हा श्लोक ज्याचा आरंभ आहे असे एक पांडुरंगाष्टक प्रसिद्ध आहे. या अष्टकावरून श्रीमदाचार्य यांच्या कालीही श्रीपांडुरंग दैवत प्रसिद्ध होते ही गोष्ट सिद्ध होते. श्रीमदाचार्य यांचा काल साधारणतः आठवे शतक असे ठरवितात. तेव्हा तत्पूर्वी म्हणजे शकाच्या सुरुवातीपासूनच या दैवताची चांगलीच प्रसिद्धी असावी असे उघड होणार आहे. कित्येकांच्या मते हे अष्टक आद्य शंकरा-

चार्यांचे आहे किंवा नाही याबद्दल संशय आहे. पण हे अष्टक आद्य शंकराचार्य यांचे असले पाहिजे. कारण, श्रीमद् आद्य शंकराचार्य यांच्या ग्रंथांचे संशोधन करून शृंगेरी मठातर्फे वाणीविलास छापखान्यात त्यांच्या ग्रंथाची जी प्रत प्रसिद्ध झाली आहे तीत विभाग १८ पान ३६ वर या अष्टकाचा समावेश करण्यात आलेला आहे.

(३) **शिलालेखीय**–आता तिसऱ्या तऱ्हेच्या पुराव्याकडे वळू. या बाबतीत तीन पुरावे भरभक्कम आहेत. एक श्रीपांडुरंगाच्या मंदिरातील चौऱ्यांशीचा शिलालेख शके ११९५ मधील, दुसरा त्यातील सोळखांबीस जातांना वरच्या बाजूस असलेल्या शिळेवरील संस्कृत शिलालेख शके ११५९ मधील व तिसरा श्रीक्षेत्र आळंदी येथील हरिहरेंद्रस्वामींच्या मठात सापडलेल्या कोणा कृष्णस्वामींच्या समाधीवरील शके ११३१ मधील चैत्र वद्य १० भौम वासरचा. या तिहींची चर्चा राजवाडे, पांगारकर वगैरेंनी केलेली आहे. तूर्त आम्हास येथे शेवटच्या लेखाचा विचार करणे आहे. कारण तो सर्वात जुना आहे. तत्संबंधी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की ज्या कृष्णस्वामीच्या समाधीवर हा शक सापडतो तीवर श्रीविठ्ठल-रुक्मिणीच्या मूर्ति आहेत व ही समाधि पंढरपुरातील नसून श्रीक्षेत्र आळंदी येथील श्रीज्ञानदेव यांच्या जन्माच्या पूर्वी साठ वर्षापूर्वीची आहे. अर्थात् यावरून इतके निश्चित होते की श्रीविठ्ठलरुक्मिणी हे दैवत श्रीज्ञानदेव यांच्या कालाच्या पूर्वी चार-पाचशे वर्षे चांगलेच प्रसिद्ध असावे व श्रीमदाचार्यांनी यावर अष्टक केले ही गोष्ट याजबरोबर विचारात घेतल्यास हे दैवत शालीवाहन शकाच्या आरंभीच दोन तीन शतकांपासून भर-भराटीत असावे असे निश्चित मानण्यास हरकत नाही.

(४) **इतर**– आता राहिला चौथ्या प्रकारचा पुरावा. आतापर्यंत आम्ही ज्याचा उल्लेख केला नाही व ज्यास चौथ्या नंबरच्या पुराव्यात घातले याचे कारण इतिहासज्ञांच्या कसोटीने जो अजून तावून सुलाखून उतरला नाही असा 'मालूतारण' नामक ग्रंथाचा पुरावा. याची विश्वसनीयता ठरल्यास श्रीपांडुरंगमूर्तीचा शालीवाहन शके ४–५ पासून इतिहास सापडतो असे सिद्ध होईल. मालूतारण हा ग्रंथ मालू नावाच्या इसमाने लिहिला. तो जातीचा सोनार होता. या ग्रंथाचे ३२ अध्याय आहेत. मालूतारण ग्रंथातील उतारा लागूपुरता पुढे देत आहोत :–

"विक्रम राजाने शालीवाहनास मारण्याचा विचार केला व मोठे लष्कर घेऊन त्याच्यावर हल्ला केला. शालिवाहन व त्याचा प्रधान रामचंद्रपंत सोनार हे फिकीरीत पडले. तोच अकस्मात् चार कोळी सरदार दहा हजार सैन्यानिशी त्यास येऊन मिळाले. त्यांची नावे :– (१) सावजी व॥ दरभाजी आघटराव, (२) कामाजी व॥ दामाजी नेहतराव, (३) देवजी व॥ केरुजी अभंगराव व (४) नाभाजी व॥ सकु परचंडराव. या चार सरदारांनी मोठा पराक्रम केला व रामचंद्रपंतास जय मिळाला. त्याने प्रसन्न होऊन त्यांस चार दिशेस स्थापन केले व त्याबद्दल सनदा करून दिल्या. नंतर राजा विक्रम यास सर्व देव सांगतात की तुमचा शक संपला आहे, आता शालीवाहन शक सुरू होणार आहे. विक्रमाने ते कबूल केले, सर्व वस्त्रे शालीवाहनाच्या स्वाधीन केली व आपण स्वस्थ बसले. प्रथमनाम संवत्सरे चैत्र शु॥ १ रोज रविवार. पुढे दिंडीरवनात वस्ती तीन योजने केली. दिंडीरवनांतील झाडे तोडून वस्ती केली. मल्लकार्जुनाचे देऊळ, पांडुरंगाचे देऊळ, मध्यभाग वोवरी व चोहों बाजूस दरवाजे, एक लाख रुपये महाद्वार पुंडलीक राया वस्तीकरून पांडु-

रंगनगरी–पंढरपूर–स्थापना केली. पांडुरंग प्रसन्न होऊन रामचंद्रपंतास भेट दिली. महाद्वारापासून मारुतीपर्यंत वस्ती अर्पण केली व चार कोळी सरदारांस पांडुरंगाचे भोवती वस्ती करून दिली. शालीवाहन राजाने सर्व मालकी रामचंद्रपंतास दिली. रामचंद्रपंताने प्रत्येक कोळी सरदारास एक हजार याप्रमाणे सैन्य, पुंडलीक, विठ्ठल, मल्लकार्जुन, काळभैरव वगैरे देवतांची उत्पन्ने वंशपरंपरा करून दिली. याप्रमाणे शालीवाहनाने सही शिक्यानिशी बक्षिसपत्रे करून दिली. शके पाच अक्षरी सुंदरनामसंवत्सरे चैत्र शु।। ७ रविवार. देशमुख देशपांडे पाटील पटवारी ४८ चाहूर जमीन इनाम करून दिली आहे."

हा समग्र ग्रंथ शुद्ध नाही व त्याची लेखी प्रत आम्हास पाहण्यास मिळाली नाही. त्याच्या छापील प्रतीवरून हा उतारा दिला आहे. ह्या ग्रंथाची विश्वसनीयता ठरल्यास श्रीपांडुरंगासंबंधाने ऐतिहासिक माहिती बरीच जुनी मिळते असे सिद्ध होईल.

श्री पांडुरंगमूर्तीच्या कालनिर्णयाच्या बाबतच्या पुराव्याची चर्चा पुरी करण्यापूर्वी त्या मूर्तीसंबंधी जे दोन तीन महत्त्वाचे समज चर्चिले जात आहेत त्यांचा विचार करणे अवश्य आहे. हे समज इतके महत्त्वाचे आहेत की त्यांचे निर्णय जर योग्य लागले नाहीत तर वारकरीसमाजांतील बहुत लोकांच्या श्रद्धेस धक्का बसण्याचा संभव आहे. म्हणून थोडी का होईना त्यांची चर्चा करून तत्संबंधी काय निर्णय मांडता येतो ते पाहणे शक्य आहे.

यापैकी पहिला समज असा की ही मूर्ति जैनांची आहे, दुसरा, ही मूर्ति कर्नाटकी आहे व तिसरा व 'मूले कुठारः' स्वरूपाचा

म्हणजे पंढरपूरच्या देवळात असणारी आजची मूर्ति ही शंकराचार्य, ज्ञानोबा यांच्यावेळची तर नव्हेच, पण ही तुकोबांच्या वेळचीही नाही. या प्रत्येकाचा थोडक्या थोडक्यात विचार करू.

(१) **श्रीपांडुरंगमूर्ति जैनांची**– कित्येकांच्या मते ही मूर्ति जैनांची आहे. रघुनाथ भास्कर गोडबोले यांनी छापून प्रसिद्ध केलेल्या भरतखंडाच्या अर्वाचीन कोशात पुंडलीकासंबंधी माहिती देताना ही पांडुरंगमूर्ति जैन आपली समजतात असे मानण्यास त्यांच्याजवळ असलेले श्लोक पुराव्यादाखल दिले आहेत.

नेमिनाथस्य या मूर्तिस्त्रिपुं लोकेषु विस्तुता ।
द्वौ हस्तौ कटिपर्याये स्थापयित्वा महात्मनः ।।
मूर्तिस्तिष्ठति सा सम्यक् जैनेंद्रेणच पूजिता ।
अहिंसा परमं धर्मं स्थापयामास वै स च ।।
युगस्तु मनुजाक्षोणि विप्रभूमिश्चवासके ।
मेलने धर्मराजस्य शकस्यच गतावधिः ।।
आषाढे शुक्लपक्षे तु एकादश्यां महातिथौ ।
बुधेच स्थापयामास विरोधकृति वत्सरे ।। जैनग्रंथ

हे श्लोक देऊन गोडबोले यांनी लगेच असे म्हटले आहे की यावरील श्लोकातील गोष्टी सिद्ध होण्यास बराच सबळ असा पुरावा पाहिजे. तदभावी यातून फारसे निष्पन्न होण्यासारखे नाही. यावरून फार झाले तर एवढेच सिद्ध होईल की महाराष्ट्रात जैन मताचा प्रसार झाला तेव्हा जैनराजाने ही मूर्ति आपल्या ताब्यात घेऊन अहिंसा धर्म स्थापनेकडे तिचा उपयोग केला.

येथे जाता जातांना एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की पंढरपूरजवळ बुद्धाचा स्तूप नाही अथवा जैनांची लेणी नाहीत. पंढरपूरसारख्या प्रसिद्ध क्षेत्रावर जैनधर्माचा कर्ता अम्मल जर

असता व पंढरपूर हे जैनांचे क्षेत्र असते तर ठाणे, कल्याणप्रमाणे पंढरपूरच्या आजूबाजूस जैनांची लेणी बहुसंख्य सापडती. पण तशातला प्रकार मुळीच नाही. यावरूनसुद्धा ही गोष्ट सिद्ध होते की पंढरपूरच्या भागावर काही काळ जैनांची सत्ता असावी व त्यांनी पांडुरंगाच्या देवळाचा काही काळ ताबा घेतला असावा. ऐतिहासिक पुराव्यावरून या पलिकडे काही सिद्ध होण्यासारखे नाही.

वास्तविक ही मूर्ति जैनांची नव्हे ही गोष्ट अंतःपुराव्यावरून म्हणजे मूर्तीच्या आंगीक भावावरून सिद्ध होणारी आहे. श्रीपंढरीनाथ हे विटेवर कमरेवर हात ठेवून उभे आहेत. पैकी एका हातात शंख आहे, एका हातात कमळ आहे व कपाळावर, पाठीवर असलेल्या शिक्याची दोरी आहे. मूर्तीत दिसून येणाऱ्या या सर्व खुणांवरून ही मूर्ति जैनांची नाही हे निःसंशय सिद्ध होणारे आहे.

(२) **श्रीपांडुरंगमूर्ति कर्नाटकी** :– ज्याप्रमाणे ही मूर्ति जैनांची आहे म्हणून कित्येकांचा समज आहे. त्याप्रमाणे कित्येकांचा ही मूर्ति कर्नाटकी अथवा कानडी आहे असाही समज आहे.

याबाबत नेहमी पुरावा देतात तो हा की ज्ञानदेवांच्या अभंगात ‘**कानडा** वो विठ्ठलु **कर्नाटकु**’ असा उल्लेख आहे. पण नुसता ‘कानडा’ हा शब्द विठ्ठलाच्या वर्णनपर अभंगात आला म्हणजे मागचा पुढचा संदर्भ न पाहता हा देव कर्नाटकातला आहे असे सांगण्याचा ज्ञानदेवांचा हेतु होता असे म्हणणे धाष्टर्याचे आहे. हा शब्द कोणत्या संदर्भात आला आहे हे वाचकास कळावे म्हणून समग्र अभंगच पुढे देतो :–

**पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळ फांकती प्रभा ।**
**अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवें तेथींची शोभा ॥ १ ॥**

कानडा वो विठ्ठलु कर्नाटकु । तेणें मज लाविला वेधु ।
खोळ बुंथी घेऊनी खुणाची पालवी । आळविल्या नेदी सादु ॥ २॥
शब्देवीण संवादु दुजेवीण अनुवादु । हें तंव कैसेनि गमे ॥
परेही परतें बोलणें खुंटलें । वैखरी कैसेनि सांगे ॥ ३ ॥
पायां पडूं गेलें तंव पाऊलचि न दिसे । उभाचि स्वयंभू असे ॥
समोर कीं पाठीमोरा हें न कळे । ठकचि पडिलें कैसें ॥ ४ ॥
क्षेमालागीं जीव उतावीळ माझा । म्हणवुनी स्फुरताती बाहो ।
क्षेम देऊं गेलें तंव मीचि मी एकली । आसावला जीव राहो ॥ ५ ॥
बापरखुमादेवीवरु हृदयींचा जाणुनी । अनुभवु सौरसु केला ।
दृष्टीचा डोळां पाहों मी गेलिये । तंव भीतरीं पालटु झाला ॥ ६॥

ज्ञा. म. ७

या संपूर्ण अभंगाचे मननपूर्वक जो वाचन करील त्यांच्या लक्षात येईल की या अभंगात पांडुरंगाचा ‘ देश ’ सांगणे हे मुख्य प्रयोजन नाही. जसा ‘ वैकुंठीचा देव आणिला भूतळा ’ या अभंगात देव कोठून आला हेच सांगावयाचे आहे, तसा हा अभंग नव्हे. खरे सांगावयाचे तर अमुक एका देशातला हा देव हे तर सांगायचेच नाही, उलट ‘ देश काल रूप नाम शब्द ’ यांच्या पलिकडे तो आहे हे या अभंगात सांगावयाचे आहे.

शिवाय एक महत्त्वाची गोष्ट येथे लक्षात ठेवणे अवश्य आहे की जरी एक वेळ महाराष्ट्रावर कानडी राज्य होते व अर्थात् जरी मराठी भाषेत कानडीप्रभव शब्द आहेत तरी पण खुद्द ज्ञानदेवांच्याच वेळेला या भाषाभगिनींचे संबंध व्यवहारात इतके दुरावले होते की ‘ अगम्य ’, ‘ अनाकळणीय ’ गोष्ट सांगावयाची असली तर आज-सुद्धा ‘कानडी’ काय बोलतोस असे एक मराठी बोलणारा दुसऱ्यास म्हणतो. नेमके याच अर्थाने ज्ञानदेवकालीहि ‘ कानडा ’ या शब्दाचा

उपयोग केला जाई. ज्ञानेश्वरीतही 'कानडा' हा शब्दप्रयोग ओव्यांतून याच अर्थाने आढळतो.

**आणि जें प्रणवा पैलीकडे । वैखरीयेसि जें कानडें ।** ज्ञाने. १२-१३

० ० ०

**हें परिसतां जरी कानडें ॥** ज्ञाने. ६-३०

तात्पर्य, या अभंगद्वारा ज्ञानदेवांना विठ्ठलाच्या स्वरूपाचा-तो सगुण का निर्गुण का दोन्हीही–काहीच निर्धार लागत नाही असे सांगावयाचे आहे. या अभंगात कर्नाटक अथवा कानडा देश यांचा काहीही संबंध नाही ! विठ्ठल हा कानडी भक्तांनी पूजला हे अमान्य करण्याचे काहीच कारण नाही. पण या प्रमाणावरून हे अनुमान निघत नाही एवढेच सांगण्याचा मुद्दा आहे.

ही मूर्ति 'कर्नाटकी अथवा कानडी आहे म्हणजे काय?' याचाही विचार होणे अवश्य आहे. याचा जर अर्थ असा असला की या देवाचे स्वरूप कर्नाटकातील तिरुपत्ती, मदुरा इकडील मूर्तीसारखे आहे तर तसे सिद्ध होण्याजोगा पुरावा अजून उपलब्ध नाही. याचा अर्थ कानडी बोलणाऱ्यांनी हा देव पूजला– प्रथम पूजला– असा धरला तर हे मतही अमान्य करण्याचे कारण नाही. या देवाच्या वारीचा धर्म चालावा म्हणून वृत्ति दिल्याचे शिलालेख कानडीतून सापडत आहेत. पंढरपूरची वारी ज्ञानदेव, नामदेव यांच्या पूर्वीची आहे हे सिद्ध करणारा शिलालेखीय पुरावा मागे दिलाच आहे. तेव्हा कानडी बोलणारे पांडुरंगाची वारी करीत ही गोष्ट सिद्ध आहे. याबाबत जसजसे अधिक संशोधन होईल तसतसा अधिकाधिक नवीन प्रकाश पडण्याचा संभव आहे व त्याकरिता कानडी भाषेतील संतवाङमय व शिलालेख यांचा अभ्यास होणे अवश्य आहे.

(३) **श्रीपांडुरंगमूर्तीचा बदल** :–आता विचाराकरिता आपण तिसरा समज घेऊ. इतिहाससंशोधक श्री. खरे यांच्या मते आजची मूर्ति ही पूर्वीची नव्हे. कारण, ती शंकराचार्य, ज्ञानोबा, तुकोबांनी जिचे वर्णन केले आहे तिच्याशी जुळत नाही.

या प्रश्नाचा विचार एका दृष्टीने मागे केलाच आहे. आता आपण दुसऱ्या दृष्टीने या प्रश्नाचा विचार करू.

आजची मूर्ति पूर्वीची नाही याचा अर्थ ती बडव्यांनी बदलली अथवा हिंदुद्वेष्टयांनी ती फोडली असा करावा लागेल. पांडुरंगाच्या देवळाचा विध्वंस केल्याचे उल्लेख आहेत, पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की मूर्ति फोडल्याचे उल्लेख नाहीत. देगाव, पुळुज या गावी अथवा प्रल्हाद भाऊ बडवे यांच्या बळदांत बडवे मूर्ति लपवीत असे उल्लेख सापडतात, पण पांडुरंगमूर्ति नष्टच झाल्याचा उल्लेख कोठेच नाही.

मूर्तीध्वंसासंबंधी एवढे लिहिले म्हणजे पुरे की 'सोमनाथ,' 'काशी' येथील मूर्तीच्या विध्वंसाच्या कथा प्रसिद्ध आहेत. पंढरपूर हेहि मुसलमानाच्या राज्यकाली दक्षिणेतील प्रसिद्ध क्षेत्र होते. जर येथील मूर्ति मुसलमानानी फोडून नाहीशी केली असती तर ह्या गोष्टीचाही उल्लेख मुसलमानी रियासतकारांनी अभिमानाने केला असता. पण असा उल्लेख कोणीहि करीत नाही. देऊळ उध्वस्त केल्याचा व ते चांगामुधेशाने बांधल्याचा उल्लेख आहे. पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे की चांगामुधेशाने नवी मूर्ति बसवली असे म्हटले नाही. याचा अर्थ असा आहे की देऊळ उध्वस्त करणार अशी बातमी कळल्याबरोबर तत्कालीन बडव्यांनी हुशारीने मूर्ति लपवली–मग ती ते तळघरात लपवीत का उपद्रव

होणार नाही अशा दूरच्या गावी लपवीत व निर्धास्त झाल्यावर पुन: आणून बसवली. शिवाय, ज्ञानदेवांच्यापासून आजतागायत सर्व संतांच्या श्रीपांडुरंगवर्णनात काही गोष्टी अगदी सारख्याच आहेत. कमरेवर हात, डोक्यावर लिंग, पायाखाली वीट व समध्यान हे सर्व वर्णनात सारखे आहे.

आता बडव्यांनी मूर्ती बदलली असे जर म्हटले तर असे मानावे लागेल की बडव्यांच्याजवळ 'फरक कळून येणार नाही' अशा पांडुरंगाच्या अगदी सारख्या तीन चार मूर्ति असल्या पाहिजेत. त्या सर्व मूर्तीत इतके साम्य हवे की जवळून पाहणारासही मूर्तीत बदल केला आहे हे कळणार नाही. पांडुरंगाचे दर्शन म्हणजे दक्षिणेकडील मदुरा, रामेश्वर येथील देवाच्या दर्शनासारखे आठ आठ दहा दहा हाताच्या अंतरावरून निरांजन लावून घडणारे दर्शन नव्हे! काही वर्षांपूर्वी तर पांडुरंगमूर्तीस आलिंगन देत असत. गेल्या शंभर सव्वाशे वर्षांत आलिंगनाचा हा प्रकार बंद होऊन फक्त पायांवर डोके ठेवण्याचा रिवाज राहिला. प्रस्तुत सांगण्याचा मुद्दा असा आहे की जर मूर्ति बदलली असती व तो बदल कळता येण्यासारखा असता तर संतांनी त्याबद्दलचा उल्लेख अवश्य केला असता. जर तसा त्यानी तो केला नाही. कारण त्यांना तो बदल कळलाच नाही—तर वर म्हटल्याप्रमाणे असे मानावे लागेल की बडव्यांच्याजवळ अगदी हुबेहुब दिसणाऱ्या पांडुरंगाच्या कमीत कमी तीन चार मूर्ति असल्या पाहिजेत. पण असाही उल्लेख बडव्यांच्या कागद-पत्रात अथवा त्यांच्या विरुद्ध बाजूच्या पक्षातील वेगवेगळ्या खटल्यात पुढे आलेल्या कागदात नाही. आमच्या मते याचा अर्थ एवढाच लागतो की प्रसंगविशेषी बडवे मूर्ति हलवीत व योग्य काळी आणून बसवीत. कागदपत्रा-

वरूनही प्रसंग येईल त्याप्रमाणे देगाव, पुळुज अथवा प्रल्हाद भाऊ बडवे यांच्या तळघरात बडवे मूर्ति लपवीत असे दिसते. पण मूर्ति फोडली अथवा बदलली असे मात्र सांगणारा पुरावा आढळून येत नाही.

(आ) **श्री पुंडलिकाचा काल**–वारकरी पंथाच्या आरंभाच्या कालनिर्णयाच्या बाबतीत दुसरे गमक म्हणजे पुंडलीकाचा कालनिर्णय यासंबंधी तर मागच्यापेक्षाही अनिश्चितता आहे. पुंडलीक हा ब्राम्हण होता. तो काशीस जात असता कुक्कुट स्वामीच्या आश्रमात त्यास गंगायमुनानदीचे दर्शन झाले. तेथून पश्चात्ताप पावून तो पितृमातृभक्त बनला व या त्याच्या सेवेने संतुष्ट होऊन देव त्याजकरिता आले. त्याने वीट मागे भिरकावली व त्यावर देव उभे राहिले. ही कथा प्रसिद्ध आहे. पण या बाबतीत गॅझिटिअरचे लेखक यांनी एक चमत्कारिक विधान केले आहे. ज्ञानुदेव व मुक्ताबाई अशी पुंडलीकाचे वडील व मातोश्री यांची अनुक्रमे नावे देऊन लेखक म्हणतो की काशीस जात असता पुंडलीकाचा मुक्काम वैष्णव रोहिदास चांभार यांच्या घरी होता. (मुंबई गॅझिटियर, व्हॉल्यूम २०, सोलापूर, पान ४३३ पाहा.) रोहिदास श्रीज्ञानदेवांचा समकालीन होय. म्हणून पुंडलीक हे रोहिदास चांभाराच्या घरी उतरले असतील हे असंभवनीय आहे. ज्ञानदेवांच्या पूर्वी पुंडलीक होऊन गेला असला पाहिजे हे वर मूर्तीच्या इतिहासाची जी चर्चा केली आहे तीवरून सिद्ध होणार आहे. तात्पर्य, गॅझिटिअरमधील ही माहिती निराधार आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

जाता जातांना पुंडलीकाबाबत आणखी एक मत प्रचलित होत आहे त्याचा विचार करू. कै. गु. डॉ. रानडे व डॉ. करमरकर

यांनी आपल्या पुस्तकात पुंडलीक हा कानडी संत होता असे गृहीत धरले आहे. डॉ. करमरकर म्हणतात :– ' पुंडलीक एक कानडी संत. हा पंढरपूरच्या देवाचा मोठा भक्त होता. पण या संताचा काल पंडित संशोधकांना अजून निश्चितरीत्या ठरवता आला नाही. (Mystic Teachings of the Haridasas of Karnatak, Page 24)

पण अगदी ताजा नवीन पुढे आलेला पंढरपूरसंबंधी पुरावा लक्षात घेता सुद्धा पुंडलीक हा कानडी संत होता हे सिद्ध होत नाही. फादर डलरी यांनी आपल्या निबंधांत याबाबत पुढील प्रमाणेच निष्कर्ष काढला आहे :–

'The assumption made by Dr. Karmarkar and by Prof. Ranade that Pundalik was a Kannad ascetic is not supported by historical evidence.'

या पुंडलीकाच्या कालाच्या चर्चेतही फारशी नक्की माहिती मिळत नाही. तेव्हा वर जे म्हटले आहे की अमूक एका सनापासून या पंथास सुरुवात झाली असे जरी सांगता येत नाही तरी श्रीज्ञानदेव व नामदेव यांच्या कालाच्या म्हणजे तेराव्या शतकाच्या बऱ्याच पूर्वकालापासून श्रीपंढरीनाथ हे दैवत भक्तानुग्रहाचे कार्य भक्ताज्ञेवरून करीत आले आहे व त्याच वेळेस आषाढ शुद्ध एकादशीस व कार्तिक शुद्ध एकादशीस बरीच यात्रा जमत असे ही गोष्ट निर्विवाद आहे.

**(इ) पंढरपूरचा काल** – आरंभाचा कालनिर्णयाच्या बाबतीत तिसरे गमक म्हणजे पंढरपूरचा कालनिर्णय. पंढरपूर हे पवित्र क्षेत्र म्हणून आज जे प्रसिद्ध आहे त्याचा उगम पुंडलीकाच्या आग्रहास्तव श्रीपांडुरंग वैकुंठातून येऊन पंढरपूरात विटेवर उभे राहिले त्या कालापासून आहे असे म्हणता येईल. तुकाराम महाराजांचा

पंढरीमहात्म्याचा 'भीमातीरी एक वसविले नगर' हा सुप्रसिद्ध अभंग उद्‌बोधक आहे. पंढरपूर जवळून वाहणाऱ्या भीमानदीचे उल्लेख भागवत व महाभारत या ग्रंथात आढळून येतात. भागवतात स्कंध ५ अ. १९ मध्ये भीमेचा खालीलप्रमाणे उल्लेख आहे :-

एतासामपो भारत्यः प्रजा नामभिरेव पुनन्ती नामात्मना चोपस्पृशन्ति ॥ १७ ॥ चन्द्रवसा ताम्रपर्णी अवटोदा कृतमाला वैहायसी कावेरी वेणी पयस्विनी शर्करावर्ता तुंगभद्रा कृष्णा वेण्या भीमरथी गोदावरी निर्विन्ध्या पयोष्णी तापी रेवा सुरसा नर्मदा चर्मण्वती सिन्धुरन्धः शोणश्च नदो महानदी वेदस्मृति-ऋंषिकुल्या त्रिसामा कौशिकी मंदाकिनी यमुना सरस्वती दृषद्वती गोमती सरयू रोधस्वती सप्तवती सुषोमा शतद्रूः- चंद्रभागा मरुद्‌वृधा वितस्ता असिक्नी विश्वेति महानद्यः ॥ १८ ॥

महाभारतातही भीष्मपर्व अ. ९ मध्ये खालीलप्रमाणे चंद्र-भागेचा उल्लेख आढळतो.

गोदावरीं नर्मदां च बाहुदां च महानदीम् ।
शतद्रूं चंद्रभागां च यमुनां च महानदीम् ॥

तात्पर्य, पंढरपूर क्षेत्र व भीमानदी ही भागवत व महाभारत-रचनाकाली प्रसिद्ध असावीत असे अनुमान काढण्यास हरकत नाही.

पंढरपूरच्याबाबत फादर डलरी यांनी म्हटले आहे की पंढर-पूरचा उल्लेख जुन्यात जुना सन ५१६ चा सापडतो. ते म्हणतात :-

'The oldest mention of Pandharpur is in the inscription dating as far back as 516 A. D.'

हा उल्लेख असणारा ताम्रपट (copper-plate) कोल्हापूर येथे सापडला.

१९०३ च्या पंढरपूरच्या वारीचा अहवाल वरिष्ठाकडे धाडतांना त्यावेळच्या कलेक्टरने पुढीलप्रमाणे म्हटले आहे :-

'Pandharpur was named after Pandurang, one of the names of Vithoba by King Shalivahan in A. D. 83'

'सन ८३ मध्ये शालीवाहन राजाने पांडुरंगाच्या नावावरून पंढरपूर हे नाव रूढ केले.'

तात्पर्य, पंढरपूर हे जुनाट क्षेत्र आहे व श्रीपांडुरंगमूर्ति व तिची उपासना हीहि पुरातन आहे. याबाबतही अधिक संशोधन होणे अवश्य आहे.

वारकरी पंथाच्या आरंभाच्या काळाची ही चर्चा पुरी करण्यापूर्वी आणखी एका महत्त्वाच्या मताचा विचार करू व हे प्रकरण आटोपू.

**वारकरीभक्तीचा उगम दक्षिण भारतात :–** खालील उतारे डॉ. करमरकर यांच्या 'मिस्टिक टीचिंग्ज् ऑफ दि हरिदासाज् ऑफ कर्नाटक' या पुस्तकातील आहेत.

'आणखी सांगावयाचे तर भक्तीचे अनेक पंथ–कर्नाटकातील दासकूट, महाराष्ट्रातील वारकरी, वीरशैव आणि श्रीवैष्णव–हे याच भागात (दक्षिण भारतात) निर्माण झाले...' (पान १६)

'दासकूटांचा इतिहास हा पंढरपूरच्या पांडुरंगाच्या–विठ्ठल देवाच्या–इतिहासाशी निगडित झालेला आहे. खरे सांगावयाचे तर हरिदास हे विठ्ठलदेवाचे **ज्येष्ठ व श्रेष्ठ भक्त होत.** (अर्थातच ते तिरुपत्तीच्या व्यंकटेशाचे व उडपीच्या कृष्णाचे भक्त होतेच.)' (पान २४)

या दोन उताऱ्यात वारकरी पंथाचा उगम दक्षिण भारतात–कर्नाटकात–झाला असे ते म्हणतात. याचा अर्थ एवढाच असला पाहिजे की महाराष्ट्रावर कानडी भाषेचे अधिराज्य असताना

विठ्ठलभक्ति या ठिकाणी रुजली तर त्यात अमान्य होण्यासारखे काही नाही. कारण, मराठी भाषेच्या उद्‌गमाकडे जर पाहिले तर असे दिसून येते की पंढरपूर ज्या प्रांतात आहे त्या प्रांतात मराठी-पूर्वी कानडी भाषा बोलली जात होती. त्यावेळी महाराष्ट्राच्या बऱ्याचशा भागावर कानडी ज्यांची भाषा अशा राष्ट्रकूट व चालुक्य घराण्याचे अधिराज्य होते. कानडी ही दरबारी भाषा होती. पंढर-पूरच्या वारीचा संप्रदाय इ. स. १२४८ इतका जुना आहे. हे दाखवणाऱ्या हेब्बळ्ळीच्या शिलालेखाचा उल्लेख मागे आला आहे. तेव्हा कानडी भाषा प्रचारात असता विठ्ठलभक्तीचा प्रसार झाला हे सर्वांसच मान्य होण्यासारखे आहे.

पण याबाबत दोन गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. त्यायोगाने आजच्या वारकरी पंथाच्या उगमाच्या प्रश्नावर अधिक प्रकाश पडण्याचा संभव आहे. पंढरपूरचा व श्रीविठ्ठमूर्तीचा इतिहास जर बघितला तर याचे उल्लेख ५१६ सनापर्यंत अथवा शकारंभापर्यंत जातात हे मागे सांगितलेंच आहे. त्यावेळी कानडीचे अधिराज्य होते असे अजून निश्चितपणे सिद्ध झाले नाही. तेव्हा विठ्ठलभक्तीचा उगम संस्कृतोद्‌भव एखादी प्राकृत भाषा व संस्कृत प्रचलित असतांना झाला असावा. तिचा प्रसार कानडी भाषेच्या काळात अधिक झाला. पुढे यादवांच्या पूर्वी एक काळ असा असावा की महाराष्ट्र हा द्विभाषिक—कानडी मराठी—असावा व यादवांच्या प्रोत्साहनाने श्रीज्ञानदेवांच्या नजीकच्या पूर्वीच्या काळात मराठीचा प्रसार होऊन कानडीचा जवळ जवळ लोप झाला असावा. हरदासांच्यापैकी ज्येष्ठ हरदास श्रीनरहरीतीर्थ यांचा समाधिकाल

...३

शके ११५३ असा डॉ. करमरकर यांनीच दिला आहे. अशा स्थितीत हरदास हे ज्येष्ठ व श्रेष्ठ भक्त असणेच शक्य नाही.

दुसरी गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी अशी आहे की कानडी प्रांतातील भक्तिमार्गी हे सर्व कमी अधिक प्रमाणात द्वैती आहेत. रामानुजाचार्य विशिष्टाद्वैती म्हणजे द्वैतीच व मध्वाचार्य तर उघड द्वैतीच. 'हरदास' मंडळी जी विठ्ठलभक्त कानडी मुलुखात झाली ही सर्व मध्वसंप्रदायी द्वैती. शिवाय हे पंढरीच्या पांडुरंगाबरोबर तिरुपतीच्या व्यंकटेशास व उडुपीच्या कृष्णास भजणारे. मध्वाचार्यांनी उडपीस कृष्णदेव बसवला व ओरिसाच्या राजाकडून रामसीतेच्या मूर्ति आग्रहाने मागून घेतल्या अथवा श्रीव्यासकृपेने त्यांना त्या प्राप्त झाल्या. त्या मूर्तींची पूजा आजवरही मठात चालू आहे. यात विठ्ठलाचा अथवा विठ्ठल-रुक्मिणीचा संबंधसुद्धा येत नाही. अशा स्थितीत 'विठ्ठल हे कानडी दैवत' म्हणजे 'कानड्यांचे' व वारकरी पंथाचा उगम कर्नाटकात झाला असा निष्कर्ष काढण्यास अधिक भरभक्कम स्वतंत्र पुरावा हवा.

वारकरी पंथातील साधना आणि कानडीभक्ति यात साम्य म्हणजे दोहोंचा देव एक विठ्ठल आहे एवढेच आहे. याव्यतिरिक्त दोहोंत फारसे साम्य नाहीच असे म्हटले तरी चालेल. कोणी म्हणेल वारकरी मुद्रा लावतात तशा त्या मध्वमंडळीही लावतात. पण, वारकऱ्यांनी त्या मध्वांच्यापासून घेतल्या असण्याचा संभव कमी. कारण, वारकऱ्यांत मुद्रा आहेत पण तप्तमुद्रा नाहीत. संभव असा की या दोन्हीही संप्रदायांनी पूर्ववैष्णव-साधनेतून त्या घेतल्या असाव्यात. मुख्य म्हणजे वारकरी हा अद्वैती 'हरि हा व्यापक सर्वगत' म्हणणारा तर माध्वपंथ अस्सल द्वैती. मध्व

संप्रदायाचा ब्राह्मण वर्गातच मुख्यत: फैलाव तर वारकरी पंथ हा ' या रे या रे लहान थोर ' असा सर्वांचा संग्राहक !

या सर्व चर्चेचे सार सांगावयाचें तर असे की श्रीविठ्ठलभक्तीचा उगम मराठी, कानडी या भाषांचे महाराष्ट्रावर अधिराज्य होण्या-पूर्वीच झाला. पण मराठीपूर्वी कानडी प्रचारात असल्याने मराठी भाषा बोलणाऱ्यांच्याही पूर्वी कन्नड भाषा बोलणारे श्रीविठ्ठलाची उपासना–वारी–इत्यादि करीत असावेत. पुढे पुरंदरदासांच्या वेळेला कन्नड भाषा बोलणाऱ्यात विठ्ठलभक्तीचा काही काळ जसा उत्कर्ष झाला तसा काही काळ ज्ञानदेवांच्या पूर्वीही झाला असेल

पण आज जो आपल्याला ' वारकरी पंथ ' म्हणून दिसतो त्याचे, जे तत्त्वज्ञान आहे, त्याचा जो आचारधर्म आहे, त्याचे जे मान्य-ग्रंथ आहेत त्याचा व आज ज्या भागात कन्नड भाषा बोलली जाते तेथील भक्तीचा फारसा संबंध असावा असे वाटत नाही. हल्लीचा वारकरी पंथ हा श्रीज्ञानदेवप्रभृति महाराष्ट्रीय संतांचाच आहे.

तात्पर्य, विठ्ठलभक्ति जुनाट. तिच्या दोन शाखा : एक शाखा कर्नाटकात फोफावली, दुसरी महाराष्ट्रात फोफावली व ती ' वारकरी ' रूपाने फोफावली. आम्ही जो मागे ' विठ्ठलभक्ति ' व ' वारकरी पंथ ' यांचा संबंध दाखवतांना फरक केला आहे तो ध्यानात घेतला म्हणजे हे कोडे सहज सुटेल. वारकरी विठ्ठल-भक्त असतो, पण प्रत्येक विठ्ठलभक्त हा वारकरी असतोच असे नाही. वारकरी पंथ तर आचार्य, पंडित यांच्यापेक्षा संतांचा आहे व आजचा वारकरी पंथ हा श्रीज्ञानदेवप्रभृति महाराष्ट्रीय संतांचाच आहे. विठ्ठलभक्तीची द्वैत शाखा कर्नाटकात वाढली व अद्वैत-

शाखा महाराष्ट्रात पसरली असे मानले म्हणजे बऱ्याच गोष्टींचा उलगडा होईल असे वाटते.

विठ्ठलभक्ति ही ज्ञानदेवांच्या पूर्वीची आहे असे ठरविण्याकरिता पान २० वर आळंदी येथील हरिहरेंद्र स्वामींच्या मठातील एका समाधीवरील विठ्ठलरखुमाईच्या मूर्तीचा उल्लेख केला आहे. पण या लेखाचे वाचन डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी नुकतेच केले आहे व त्यांच्यामते कै. राजवाडे यांनी केलेले या शिलालेखाचे वाचन बरोबर नाही. त्यांच्यामते या लेखाचा काल शके ११३९ (इ. स. १२१७) चैत्र शु॥ ५ असा आहे. तो लेख एका सतीच्या समाधीवरचा आहे व त्यावरील मूर्ति विठ्ठलरखुमाईच्या नसून हात जोडून उभ्या असलेल्या एका साध्या दांपत्याच्या आहेत. या वाचनामुळे या शिलालेखाचा विठ्ठलभक्ति पुरातन आहे हे सिद्ध करण्याचा पुरावा म्हणून उपयोग होणार नाही. पण आता या पुराव्याची फारशी गरजही नाही. कारण, यासंबंधी माहिती देणारे नवीन शिलालेख व ताम्रपट इतके सापडले आहेत की त्यावरून ज्ञानदेवांच्या पूर्वी अनेक वर्षे लोक विठ्ठलभक्ति करीत होते ही गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली आहे.

आता आपण या पंथाच्या वाढीच्या भागाकडे वळू.

## २. श्रीज्ञानदेव व नामदेव यांचा काल

या भागात आम्ही केवळ श्रीज्ञानदेव व नामदेव या जोडीच्या कालाचा म्हणजे शके ११९३ ते शकें १२७२ पर्यंतचाच विचार करणार आहोत. हे स्पष्ट सांगण्याचे कारण डॉ. भांडारकरप्रभृति मंडळींच्या मते श्रीज्ञानदेव व नामदेव यांच्यामध्ये एका शतकाचे

तरी अंतर असावयास पाहिजे. हे मत एका काळी बरेच प्रचलित होते; पण ते मत निराधार आहे ही गोष्ट सर्वमान्य व संशयरहित असा नरसिंह मेहता यांच्या काव्याचा पुरावा आणून पंडित पांडुरंग शर्मा यांनी चित्रमयजगतातील आपल्या लेखात सिद्ध केली आहे. तेव्हा आम्ही श्रीज्ञानदेव व नामदेव हे समकालीन होते ही गोष्ट सिद्ध धरूनच या विभागास 'श्रीज्ञानदेव व नामदेव यांचा काल' असे नाव दिले आहे.

आणखी एका गोष्टीचा खुलासा होणे आवश्यक आहे. जसा ज्ञानदेव व नामदेव भिन्नकाली होऊन गेले असा सुशिक्षितात एकवेळ समज होता तसाच ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव एक व अभंगकर्ते ज्ञानदेव एक, असे दोन ज्ञानदेव होते, असाही एक समज रूढ होता. या शंकेचे निरसन हरिभक्तिपरायण कै. भिंगारकरबुवा यांनी लिहिलेल्या निबंधात उत्तमरीतीने केले आहे. आता तर अभंगातील भाषा व विचार या अंतर्गत पुराव्या-वरूनही तीच गोष्ट निर्विवाद सिद्ध झालेली आहे. तेव्हा अभंग-कर्ते ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव एकच होते हेही सिद्ध आहे असे समजूनच या विभागातील चर्चेची उभारणी केली आहे. ज्ञानदेव नामदेव यांचे संबंध व एक ज्ञानदेव का दोन ज्ञानदेव या गोष्टींची चर्चा आमच्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेत विस्तृतरीतीने केली आहे. ती वाचकांनी पाहावी.

वारकरी पंथ हा जरी श्रीज्ञानदेव व नामदेव या जोडीच्या कालाच्या पूर्वी होता तरी त्याचे कार्य या दृष्टीने त्याचा आरंभ या जोडीच्या कालातच झाला ही गोष्ट निर्विवाद आहे. देवाचा मोठेपणा एका दृष्टीने त्याच्या भक्ताच्या श्रेष्ठपणावर अवलंबून

आहे असे म्हटले तरी चालेल. श्रीज्ञानराज हे ज्ञान्यांचे चक्रवर्ती राजे, योग्यांतील योगी व अनुभवियांचे शिरोमणी होते. हे जेव्हा 'बापरखुमादेवीवर विठ्ठलाचे' भक्त बनले त्यावेळी या दैवताच्या भजनास विशेषच जोर चढला.

श्रीज्ञानदेव आपले श्रीपांडुरंगावरील प्रेम पुढील अभंगात व्यक्त करीतात :-

**माझे जीवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ।। १ ।।**
**पांडुरंगीं मन रंगलें । गोविंदाचे गुणीं वेधलें ।। २ ।।** ज्ञा. म. १०२

० ० ०

**जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ।।** ज्ञा. म. ३२४

श्रीनिवृत्तिनाथ (शके ११९५), श्रीज्ञानदेव (शके ११९७), सोपानदेव (शके ११९९) व मुक्ताबाई (शके १२०१) ही चार अलौकिक भावंडे होती. यांच्या कुळात यांची आजी नीराबाई हिला गहिनीनाथांचा उपदेश होता.

**विठ्ठल आवडी ठेवियलें नाम । निराईस प्रेम गहिनीनाथीं ।।** ना. म. ८८९

निवृत्तिनाथांच्या अल्पवयातच गहिनीनाथांचा त्यास उपदेश मिळून ते कृतार्थ झाले व त्यांनी आपले बंधु व बहीण यांना कृतार्थ केले. यामुळे अत्यंत अल्पवयात म्हणजे मौजीबंधनाकरिता शुद्धिपत्र मिळविण्यास प्रतिष्ठान नगरी गेल्यापासूनच त्यांचे अलौकिक तेज चमकण्यास प्रारंभ झाला. या चारी भावंडांचा विठ्ठलरुक्मिणीच्या पोटी चमत्कारिक परिस्थितीतील झालेला जन्मच त्यांच्या अंगचे अलौकिक सामर्थ्य इतक्या अल्पवयात लोकांच्या नजरेस आणण्यास कारणीभूत झाला. पैठणाहून शुद्धिपत्र मिळवून अथवा शुद्धिनिरपेक्ष शुद्धस्वरूप आपण कसे आहोत हे पैठणकर ब्राम्हणास दाखवून ही

मंडळी ज्यावेळी परत फिरली त्यावेळी वाटेत महाराष्ट्रभूमीत गोदावरीच्या दक्षिण तीरावर असणारे, श्रीमोहिनीराजांच्या वास्तव्याने पुनीत झालेले जे नेवासे क्षेत्र त्या ठिकाणी, आपलें गुरु जे निवृत्तिनाथ त्यांच्या सान्निध्यात, आपल्या वयाच्या केवळ पंधराव्या वर्षी श्रीज्ञानदेव यांनी भगवद्‌गीतेवर भावार्थदीपिका उर्फ ज्ञानदेवीरूपी मराठी अलंकार चढविला, किंबहुना वारकरी संप्रदायाचा पायाच भरभक्कम घातला. श्रीज्ञानदेवी अथवा श्रीज्ञानेश्वरी हा ग्रंथ आपल्या भाषासौष्ठवाने, आतील कर्म भक्ति ज्ञान योग यांच्या मधुर मिलाफाने, मराठी भाषा जोपर्यंत हयात आहे तोपर्यंत अजरामर राहील यात शंका नाही. ख्रिस्ती धर्मात जसे बायबल, मुसलमानी धर्मात जसे कुराण तशी वारकरी पंथात श्रीज्ञानेश्वरी आहे. सर्व वारकरी समाज या ग्रंथास व ग्रंथकर्त्यास ' माउली ' या अत्यंत प्रेमळ नावाने संबोधीत असतो. या ग्रंथाशिवाय श्रीज्ञानदेवांनी अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, हरिपाठ, अभंग वगैरे पुष्कळ ग्रंथरचना मराठीत केली आहे. त्याचप्रमाणे त्यांचे गुरु निवृत्तिनाथ, बंधु सोपानदेव व भगिनी मुक्ताबाई यांनीही महाराष्ट्रीय भाषेतच काही ग्रंथरचना केली आहे. श्रीनिवृत्तिनाथांनी गीतेवर ' निवृत्तिदेवी ' या नावाची व सोपानदेवांनी ' सोपानदेवी ' या नावाची मराठी भाषेत टीका केली असा उल्लेख सापडतो. ' निवृत्तिदेवी ' व ' सोपानदेवी ' या नावाच्या टीका त्यांच्या म्हणून प्रसिद्धही आहेत. पण त्या टीका त्यांच्याच आहेत हे अजून निर्विवाद सिद्ध झाले नाही.

श्रीज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या शेवटी म्हटल्यावरून त्यांच्या काळी ' स्वराज्य ' होते ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु वैदिक धर्म मात्र महाराष्ट्रापुरता तरी निदान विस्कळित होण्याचा रंग दिसू लागला

होता. श्रीज्ञानदेवांना, धर्माचे मर्म बाजूला राहून बाह्य गोष्टीवरच लोक जोर कसा देऊ लागले होते, ही गोष्ट स्वानुभवाने कळून चुकली होती. त्यांच्या दृष्टीने धर्माच्या विस्कळीत स्थितीचे मुख्य कारण तद्विषयक सामान्य लोकांचे अज्ञान हे होय. वैदिक धर्मातील सर्व धार्मिक ग्रंथ संस्कृतात व बहुजनसमाज हा कालौघावरोबर त्या भाषेस अनोळखी होत चाललेला, अंतःकरणाला जीवनाचा ओलावा देणाऱ्या धर्माचे अज्ञान ज्यावेळेस एखाद्या समाजात वाढते त्यावेळेस तो अज्ञ समाज धर्मांतर करण्यास साहजिकच तयार होतो.धर्मांतर करण्यास याचमुळे नेहमी समाजाचे खालचे थर—की जेथपर्यंत शुद्ध धर्मज्ञान पोहोचू शकत नाही तेच—तयार होतात. श्रीज्ञानदेवांस ही आपत्ति घडधडीत दिसत होती. एवढ्याचकरिता त्यांनी आपला ग्रंथ मराठीत लिहिला.

**तोरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें ।**
**रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तिदेवें ।।** ज्ञाने. ११-९

श्रीज्ञानदेव यांच्या काली जैन पंथाचा बराच जोर झाला होता असे दिसते. कारण वेदनिंदक पाखांड्याचे वर्णन करतांना त्यांनी जैनांचेच वर्णन केल्यासारखे दिसते.

**नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढे बंड ।**
**तें देखोनि पाषांड । आनंदचि वाजे ।।** ज्ञाने. १३–१९

० ० ०

**पाषांडाचे कडे । नागवी लुंचिती मुंडे ।**
**नियोजिलीं वितंडें । ताळासी येती ।।** ज्ञाने. १३–२१

तात्पर्य, समाजातील संस्कृतानभिज्ञ बराचसा भाग परधर्माकडे झुकायला लावल्यामुळे ही वैदिक धर्मरूपी नाव डुबते की काय असे वाटूनच श्रीपांडुरंगाचे अवतार श्रीज्ञानदेव यांनी ‘येरां भवव्यथा

ठेलिया । स्त्रीशूद्रादि प्राणियां ' सुलभ देवप्राप्तीचा मार्ग करून ठेवणारी जी गीता तीवर मराठीत टीका केली. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी होऊन गेलेले संत अथवा त्यांच्या समकालीन इतर पंथातले मानभावांसारखे महंत यांचा कल ज्ञान गुप्त ठेवण्याकडे होता. उलट श्रीज्ञानेश्वर हे 'प्रगट गुह्य बोले' अशा विचाराचे व कृतीचे व म्हणूनच त्यांनी सर्व ग्रंथ सुबोध मराठीत रचले. श्रीज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीरूपी प्रतिसृष्टीच निर्माण करून वारकरी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानास मूर्त स्वरूप दिले असे म्हणण्यास हरकत नाही.

हा पाया भरभक्कम करण्याची कामगिरी जरी श्रीज्ञानदेव यांनी केली तरी वारकरी भजनकीर्तनाचा हा मार्ग रूढ करून श्रीपंढरीनाथाची कीर्ति पंजाबातील घुमान गावापर्यंत पोचविण्याची कामगिरी श्रीपंढरीनाथाचे कंठमणी, श्रीज्ञानदेवांच्या समकालीन, एवढेच नव्हे तर, सोपानशिष्य विसोबाखेचरद्वारा नाथपरंपरेत समाविष्ट झालेले, बालभक्त श्रीनामदेव यांनी केली. श्रीज्ञानेशांनी मराठीत ओवी विशेषत्वाने रूढ केली, तसेच 'अभंग' हे वृत्त ओवीच्या थोड्याफार फरकाने नामदेवराय यांनी सुरू केले व शतकोटी अभंग रचण्याची भीष्मप्रतिज्ञा करून आपल्या आयुष्याअखेर ती बहुतेक तडीस नेली. श्रीनामदेव यांचा जन्म व पूर्ववय पंढरपूरातच गेलेले असल्यामुळे त्यास श्रीपंढरीशाची उपासना बालपणातच लाभली व त्यांनीही त्या अपूर्व संधीचा फायदा घेऊन कौमारवयातच भक्तवत्सल श्रीपंढरीनाथास स्ववश केले. महाराष्ट्रातील कीर्तनभक्तिरूप सरस्वतीस गुप्त रूपातून काढून भरतखंडास पावन करण्याइतका तिचा ओघ उघड विस्तृत करण्याचे मुख्य श्रेय शिंपीभक्त नामदेवराय यांसच दिले पाहिजे.

**तें या नामयाचें होतें हृदयकमळीं । कथा भूमंडळीं प्रगट केली ।।** ना. म. ९७०

० ० ०

**उघडली मांदुस भक्तिनाम तारूं । विठ्ठल उद्धारु कलियुगीं ।।** ना. म. ९६९

आळंदी येथे जिवंत समाधि घेतलेले श्रीनिवृत्तिनाथसुत हे खरोखरच ज्ञान-देव (ज्ञानाचे उपास्य-देव) होते तर श्रीपांडुरंगाच्या तळीच्या पायरीखाली बसणारे बालभक्त, महाराष्ट्रीय कीर्तन-परंपरेचे नारद हे खरोखरच नाम-देव (नामाचे उपास्य-देव) होते. याचा अर्थ एकात दुसरे नव्हतेच असे मात्र नाही. श्रीज्ञानेश्वरी अ. ९ श्लोक १४ यात 'सततं कीर्तयन्तोमाम्' यावरचे श्रीज्ञानदेवांचे भाष्य ज्यांनी वाचले असेल त्यास ज्ञानदेव हे कीर्तनात किती रंगलेले होते व ही भक्ति त्या काली केवढ्या थोर पदवीस पोहोचली होती हे उघड होणार आहे. या दोहोंचा-ज्ञानाचा व नामाचा-अपूर्व मिलाफ श्रीपांडुरंगाच्या कृपेने पंढरीत झाला.

श्रीज्ञानदेव व नामदेव यांचा फार जिव्हाळ्याचा संबंध होता. जनाबाई म्हणतात :-

**सखा विरळा ज्ञानेश्वर । नामयाचा जो जिव्हार ।।** १७७

दोघेही एकाच देवाचे भक्त आणि शिवाय ज्ञानदेव हे नामदेवांचे आजेगुरु, यामुळे तर हा दोहोंचा मिलाफ फारच गोड झाला. त्याचाच परिणाम म्हणजे त्या काली महाराष्ट्रात निरुपम अशी संतपरंपरा निर्माण झाली. नामदेवरायांनी पावन करणाऱ्या हरि-कथेच्याद्वारा सर्व भरतखंडाला पुनीत केले. परंतु यात्रेच्या मिषाने असे करण्याची मूळ कल्पना श्रीज्ञानदेवांची, तथापि तिला मूर्तस्वरूप देऊन ती अंमलात आणण्याचे बहुतेक श्रेय श्रीनामदेव यांसच देणे योग्य आहे. नामदेव पुष्कळ कार्य करू शकेले व ज्ञानदेव हे विस्ताराचे कार्य फार करू शकले नाहीत याचे मुख्य कारण

श्रीनिवृत्त्यादि चारही भावंडांनी आपली इहलोकीची यात्रा विशीपंचविशीच्या आतच आवरली. उलट, नामदेवराय हे एकंदर ऐंशी वर्षे व श्रीज्ञानदेवाच्या समाधीनंतर पन्नास वर्षे जगले व यामुळे साहजिकच प्रसाराचे कार्य त्यांच्याकडून अधिक प्रमाणावर झाले. दुसरीही एक गोष्ट या बाबतीत लक्षात ठेवण्यासारखी आहे. प्रतिपक्षी ज्यावेळेस तुल्यबल असते त्यावेळेस लढणारास खरा चेव येतो व त्याच्या अंगची खरी मर्दुमकी बाहेर पडते. श्रीज्ञानदेव यांच्याकाली स्वराज्य असल्याने स्वधर्मास, परकीय व परधर्मीय सत्तेच्या तेजाखाली वावरणाऱ्या परधर्मास तोंड देण्याची पाळीच आली नाही. परंतु नामदेवांच्या आयुष्याच्या उत्तर भागात ही स्थिति पालटून शके १२९६ त देवगिरी उर्फ दौलताबादचा जाधव राजा रामदेवराव याचा मुलगा शंकरदेव याचा अल्लाउद्दीन खिलजीने पराभव केला व महाराष्ट्राचे स्वातंत्र्य जवळजवळ विलयास लाविले. अर्थात् नामदेवराय यास परधर्माशी साक्षात् तोंड देण्याचा प्रसंग आला व त्यामुळे त्यांचे तेज विशेषत्वाने बाहेर चमकले.

श्रीज्ञानदेव-नामदेव यांचा काल अनेक दृष्टींनी मोठा अपूर्व होता. विष्णुचा अवतार झाला म्हणजे जसे इतर देवही त्याजबरोबर अवतार घेतात, चंद्र उदयास आला म्हणजे इतर तारागणही जसा उदय पावतो अथवा सार्वभौम चक्रवर्ती राजा निघाला म्हणजे आपली मुगुटशिखरे त्याच्या चरणावर नत करणारी नृपतिपंक्ति ज्याप्रमाणे त्याजबरोबर निघते. त्याचप्रमाणे श्रीविष्णु अवतार, ज्ञानियांचे राजे ज्ञानदेव हे ज्यावेळी या आनंदभुवनात अवतरले त्याकाळी एकदम अनेक संत निर्माण झाले. त्यावेळेस अशी जात राहिली नाही की जीत संत निर्माण झाले नाहीत

असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. त्यावेळचे रूढवीर संतच सांगावयाचे म्हटले तरी श्रीनिवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, विसोबा खेचर (ब्राह्मण), नामदेव (शिंपी) नरहरी सोनार (सोनार), सांवता माळी (माळी), जनाबाई (नामदेवाची दासी), गोरोबा (कुंभार), राका, वंका, चोखामेळा (महार), रोहिदास (चांभार) इतकी यादी सहज होईल. या सर्व संतग्रहमेळीत श्रीज्ञानदेव हे भानूसारखे चमकत असत व त्याचवेळेस हा सर्व संतभार आषाढ शुद्ध एकादशीस व कार्तिक शुद्ध एकादशीस पंढरपूरास जमत असे व सर्व पंढरपूर नामगजराने दुमदुमून जात असे.

विठ्ठल विठ्ठल गजरीं। अवघी दुमदुमली पंढरी ।। चोखोबा ६३

० ० ०

आषाढी कार्तिकी विसरूं नका मज। सांगतसे गूज पांडुरंग ।।

ना. म. १८०३

० ० ०

संतभार पंढरींत। कीर्तनाचा गजर होत ।।
तेथें असे देव उभा। जैशी समचरणाची शोभा ।।
रंग भरे कीर्तनांत। प्रेमें हरिदास नाचत ।।
सखा विरळा ज्ञानेश्वर। नामयाचा जो जिव्हार ।। जनाबाई १७७

० ० ०

उंच पताका झळकती। टाळ मृदंग वाजती।
आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचे ।। १ ।।
आले हरीचें विनट। वीर विठ्ठलाचे सुभट।
भेणें जाहले दिप्पट। पळती थाट दोषांचे ।। २ ।।
तुळशीमाळा शोभती कंठीं। गोपीचंदनाच्या उटी।
सहस्र विघ्नें लक्ष कोटी। बारा वाटा पळताती ।। ३ ।। ज्ञा. म. २०५

० ० ०

आषाढी कार्तिकी भक्तजन येती। चंद्रभागेमध्यें स्नानें जे करिती ।।

**दर्शनहेळामात्रे तया होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ।।**
ना. म. २३६६

हे सर्व संत वर्षांतून दोनदा पंढरीस जमूनच स्वस्थ बसत असे नव्हे. त्यापैकी प्रत्येकाने मराठीत अभंग वृत्तांत सुंदर काव्ये व तीही श्रीज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'रसिकत्वीं परतत्व । स्पर्श जैसा' असली परे पलीकडील वस्तु शब्दात आणणारी काव्ये करून ठेविली व अशा रीतीने कवित्व व कीर्तनभजनद्वारा सर्व महाराष्ट्र किंवहुना अवघे आर्यावर्त महासुखाने दुमदुमित करून टाकिले. त्याकाळी या सर्व संत मंडळीनी 'कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तिन्हीं तें वैकुंठचि केलें आघवें ।' अशी स्थिति भूमंडलावर केली व उदार महाराष्ट्र-धर्माचा-वारकरी पंथाचा–पाया अचल व अजरामर असा करून ठेविला.

## ३. श्रीभानुदास व एकनाथ यांचा काल

यानंतर कीर्तनभजनाचा संप्रदाय व पंढरपूरची वारी हा क्रम जरी सारखा अव्याहत चालू होता तरी यानंतर सुमारे शंभर-सवाशे वर्षेपर्यंत आपल्या तेजाने इतर ताऱ्यास दिपवून टाकून आपल्याकडे लोकांचे नेत्र आकर्षण करणारा असा तारा वारकरी-क्षितीजावर चमकला नाही. श्रीज्ञानदेव–नामदेव यांच्या कालानंतरचा असा तारा म्हणजे श्रीनाथांचे पणजे, पैठणकर भानुदास महाराज हे होत. (१३७० च्या सुमारास) त्यांनी आपल्या निरपेक्ष वारीच्या तपाने वारकरी साधनमार्गात काय तेज आहे, हे पुन्हा लोकांच्या चांगलेच निदर्शनास आणिले. तो ऐतिहासिक प्रसंग असा :– एकदा एका ब्राह्मणाने विद्यानगर अथवा विजयानगर (अनागोंदी) येथील राजाइभक्त रामराजाजवळ पंढरपूरची व तेथील मुख्य देवता श्रीपांडुरंग यांची स्तुति केली. ती सहन न

होऊन स्तुति करणाऱ्या ब्राह्मणास कैदेत टाकून राजा पंढरपूरास त्या ब्राह्मणाने वर्णन केलेले ऐश्वर्य आहे किंवा काय हे तपासण्याकरिता आला. तेव्हा त्यास त्या ब्राह्मणाच्या वर्णनापेक्षाही अलौकिकता तेथे दिसून आली. तेव्हा समर्थ असल्यामुळे त्याने श्रीविठ्ठलाची मूर्ति उचलून अनागोंदीस नेली व आपल्या पूजेकरिता स्वतंत्र मंदिर बांधून त्यात ती मूर्ति ठेवली. पुढे आषाढी एकादशीला यात्रा जमली व पाहतात तो देवळात मूर्ति नाही. मात्र ती मूर्ति अनागोंदीस नेल्याचे कळून आले. तेव्हा भानुदास महाराज यांनी चाचरणाऱ्या, घाबऱ्या भक्तास आश्वासन देऊन सांगितले की 'मी मूर्ति घेऊन येतो, तुम्ही बसा.' यानंतर ते जे निघाले ते थेट विजयानगरच्या बाहेर तुंगभद्रेच्याकाठी येऊन पोहोचले. रात्र पडल्यावर देवाच्या दर्शनास गेले असता भगवंतांनी आपल्या गळयात असलेला रत्नांचा हार त्यांच्या गळयात घातला व पंढरपूरास दुसऱ्या दिवशी येण्याचे कबूल केले. दुसरे दिवशी सकाळी देवाच्या गळयातील रत्नांचा हार कडयाकुलुपांतून चोरीस गेला असे आढळून आले. शोध करिता तो हार भानुदासांच्या गळयात दिसून आला. लगेच त्यास कैद करून त्यांचा इन्साफ करून, त्यास सुळावर देण्याची शिक्षा सांगण्यात आली. सुळावर जाण्यापूर्वी एकदा भगवंताच्या दर्शनाची परवानगी असावी असे त्यांनी सांगितल्यावरून त्यास ती देण्यात आली. वाटेत दर्शनाला गेले असता त्यांनी देवासमोर केलेले हृदयास पाझर फुटणारे असे त्यांचे अभंग प्रसिद्ध आहेत.

**जं आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ।**

**वडवानळ त्रिभुवन खाये । तरी तुझीच वाट पाहें गा विठोबा ॥१॥**

**न करी आणिकांचा पांगिला । नामधारक तुझाचि अंकिला ॥२॥** भा. म. ५७

पुढे अशी करुणा भाकीत असता शिपायांनी त्यास सुळापाशी ओढून नेले. तो चमत्कार असा झाला की सुळास पाने फुटली. ही बातमी राजाच्या कानी गेल्यावर राजा स्वत: तेथे आला व भानुदासमहाराजांचा आदरसत्कार करून मूर्ति परत घेऊन जाण्यास परवानगी दिली व भानुदास महाराजांनी ती मूर्ति परत पंढरपूरास आणली.

ही मूर्ति अनागोंदीहून भानुदासमहाराजांनी आणल्याची हकीकत वर दिली आहे. त्याबाबत इतिहास संशोधकांमध्ये वेगवेगळी मते सध्या आढळून येतात. कित्येकांच्या मते अनागोंदीस पंढरपूरहून जी मूर्ति नेली ती परत आणली गेलीच नाही. ती तेथेच ठेवली गेली व पंढरपूरास दुसरीच मूर्ति बसवली. पण कित्येकांच्या मते पंढरपूरची मूर्ति अनागोंदीस नेलीच गेली नाही. सर्वच अनुमाने आहेत. नवीन संशोधनाने अजून निश्चित काहीच ठरलेले नाही. म्हणून जुने लोक सांगत आलेली व वारकऱ्यांत मान्य असलेली हकीकतच दिली आहे.

'श्रीज्ञानदेवानंतर तुकाराममहाराजापर्यंत वारकरीपंथास चालना देऊन तो सुसंघटित करण्याचा प्रयत्न कोणीच केला नाही.', असले अविचारित विधान गॅझिटिअरमध्ये सापडते. वास्तविक असा प्रयत्न थोडचा प्रमाणात भानुदासमहाराजांच्यानंतर दोन पिढयांनी श्रीतुकाराममहाराज यांच्या अव्यवहित पूर्वकालीच झाला व तो भानुदासांचे पणतु श्रीएकनाथमहाराज पैठणकर यांनी केला. यांच्या कामगिरीची रूपरेषा थोडक्यात लिहावयाची म्हणजे श्रीज्ञानदेव-नामदेव या जोडीच्या कामगिरीसारखीच कामगिरी ग्रंथलेखनद्वारा व कीर्तनभजनद्वारा यांनी केली. श्रीनाथांना ईशकृपेने आयुष्य एकावन्न वर्षे (१४७०–१५२१) लाभले होते. परमात्मकृपा ही

गृहव्यवस्थेचा भार अंगावर पडण्यापूर्वीच श्रीजनार्दनस्वामी यांचे-द्वारा लाभली होतो. अपूर्व प्रारब्धाने प्रपंचात सहधर्मचारिणीही गिरजाबाईसारखी मूर्तिमंत शांतिच मिळाली होती. या दुर्लभ योगामुळे नाथांचा आयुष्यक्रम त्यांनी भागवतातून व अभंगातून वगैरे वर्णन केल्याप्रमाणे तंतोतंत शांतिब्रह्मासारखा चालला होता.

आम्ही वर श्रीनाथांची कामगिरी श्रीज्ञानदेव व नामदेव या जोडीच्या कामगिरीसारखी आहे असे त्यांच्या कामगिरीचे थोडक्यात वर्णन केले, ते तात्त्विकदृष्टचा किती यथार्थ आहे हे पुढे पाहू, पण तूर्त केवळ त्यांच्या ग्रंथरचनेकडेच दृष्टी दिली तरीही आमच्या म्हणण्याची सत्यता पटणारी आहे. श्रीनामदेवांनी अभंगवृत्तांतच सर्व रचना केली. श्रीज्ञानदेवांनी अभंग केले, पण बहुतेक सर्व रचना ओव्यांत केली. नाथांनी ओवी व अभंग या दोन्हीतही सारखीच ग्रंथरचना केली आहे.

श्रीनाथांनी श्रीमद्व्यासकृत भागवताच्या एकादशस्कंधावर ओवीबद्ध टीका लिहून श्रीज्ञानेवरीस जोड दिली. याशिवाय त्यांचे हस्तामलक, स्वात्मसुख, आनंदलहरी, शुकाष्टक, चतुःश्लोकी भागवत, रुक्मिणीस्वयंवर असे ओवीबद्ध लहान लहान ग्रंथ आहेतच. याशिवाय आणखी ओवीबद्ध ग्रंथ-जो त्यांच्याकडून पुरा न झाल्यामुळे त्यांच्या कृपाप्रसादाने गावबाने पुरा केला तो – म्हणजे भावार्थरामायण, इतकी विस्तृत ओवीबद्ध ग्रंथरचना श्रीनाथांनी केली आहे. याशिवाय नाथांनी अभंगरचना बरीच केली आहे. त्यांचे अभंग चार हजारावर प्रसिद्ध आहेत. नाथांचे अभंग अत्यंत बहारीचे आहेत. विशेषतः त्यांची रूपके, वासुदेव, आंधळे, फुलवरा, भारूड ही तर मनाला चटका लावून सोडणारी आहेत. नाथांनी वारकरी पंथास कसा उजळा दिला हे त्यांच्या भागवताच्या व

अभंगाच्या वाचनावरून उत्तम लक्षात येणारे आहे. नाथांनी जरी श्रीमद्भागवतावर टीका केलेली असली तरी सूक्ष्म दृष्टीने पाहणाऱ्यास असे दिसून येईल की, एकनाथी भागवत हे ज्ञानेश्वरीरूपी सूत्रावरील भाष्यच आहे. किंबहुना तो ज्ञानेश्वरीचा दुसरा अवतारच असे म्हणावयास हरकत नाही. ज्ञानेश्वरी ही 'आबालवृद्धास' परमार्थ सुबोध व्हावा एवढ्याकरिता ज्ञानराजांनी लिहिली ही गोष्ट खरी. तसेच ज्ञानेश्वरीची भाषा गोड व मार्दवपूर्ण, दृष्टांत चढते, मार्मिक व पटणारे, हे सर्व खरे. परंतु तीनशे वर्षांत भाषेत अंतर बरेच पडले. शिवाय त्यातील विचार व ग्रथित केलेले अनुभव इतके उच्च आहेत की सामान्य मनुष्यही ते वाचीत असता उंच फेकला जातो व त्या हवेत त्यास श्वासोश्वास करणेही फार वेळ मुष्किलीचे होते. लिहिणाऱ्याची भूमिकाच अति उच्च असल्यामुळे वाङ्मयही फार गोड पण अति उच्च दर्जाचे निघाले. यामुळे फारच थोडक्या काळात असा प्रसंग येऊ लागला की साठीच्या माणसालाही कर्त्याच्या विशीत लिहिलेल ग्रंथ समजण्यास डोक्यास ताण पडू लागला.

श्रीनाथांचे चरित्र याहून अगदी भिन्न, स्वत: गृहस्थाश्रमी व स्वभावही मूर्तिमंत शांतिब्रह्म. यामुळे त्यांची भाषा व अनुभव मांडण्याची पद्धति ही साहजिकच, सर्वसाधारण मनुष्यास पटेल, कोणाच्याही आटोक्यात येईल अशीच होती. नाथांच्या भागवतात अद्वैत वेदांत तर प्रतिपाद्यच आहे, पण त्यात हरिभक्ति व 'नामस्मरण' याचीही कीर्ति अत्यंत विशद करून सांगितली आहे. तिचा वारकरी समाजावर इतका परिणाम झाला आहे की श्रीनाथांनी जरी ज्ञानेश्वरीचे संशोधन केले व तिला उजेडात आणिली तरी

कित्येक वर्षें अशी स्थिति होती की ज्ञानेश्वरी वाचावयाची व पाठीशी वागवावयाची, पण कीर्तन म्हणजे ते श्रीतुकोबांचे अभंग व नाथांच्या ओव्या यांच्यावर चालावयाचे. हल्ली मात्र पुन: ज्ञानेश्वरीच विशेषत: वारकरी कीर्तनातून येऊ लागली आहे.

श्रीनाथ व श्रीज्ञानदेव यांचा किती जिव्हाळयाचा संबंध होता हे आणखी एका गोष्टीवरून उघड होणारे आहे. व त्यात ओघानेच नाथांस श्रीज्ञानदेवानंतर इतके उच्च स्थान दिले जाते त्याचाही खुलासा होणार आहे. श्रीनाथांना श्रीज्ञानदेवांचा असा दृष्टांत झाला की माझ्या गळयाला अजान वृक्षाची मुळी लागली आहे, ती येऊन काढ. त्याप्रमाणे नाथ आळंदीस गेले, समाधीत गेले व मुळी काढली.

**श्री ज्ञानदेवें येऊनि स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ।।१।।**
**दिव्य तेज:पुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसें ।। २।।**
**अजानवृक्षाची मुळी कंठाशीं लागली । येऊनि आळंदीस्थळीं काढ वेगी ।।३।।**
**ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरीं । तंव नदीमाझारीं देखिलें द्वार ।।४।।**
**एका जनार्दनीं पूर्व पुण्य फळलें । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ।।५।।**

नाथ आळंदीहून परत आल्यावर त्यांनी ज्ञानेश्वरीत जी पाठांतरामुळे अशुद्धता उत्पन्न झाली होती ती शुद्ध करून ज्ञानेश्वरी शुद्ध केली. श्रीनाथांनी त्याकरिता त्या कालात किती प्रयास केले असतील हे त्यांच्या पूर्वीच्या उपलब्ध असलेल्या पोथ्यांशी त्यांनी शुद्ध करून प्रचलित केलेल्या पोथीची तुलना केली की कळून येणारे आहे. ज्ञानेश्वरी शुद्ध स्वरूपात आज वाचावयास मिळते हे श्रीनाथांचेच उपकार आहेत.

ज्ञानेश्वरी ग्रंथरचना कोणत्या दिवशी समाप्त झाली त्यासंबंधीची माहिती दुर्दैवाने आज आपणास उपलब्ध नाही. ती असती तर

त्या शुभमंगलदिवशी हजारो ज्ञानेश्वरी–भक्तांनी तो दिवस महाराष्ट्रभर जागून साजरा केला असता. परंतु सुदैवाने त्याची अंशतः उणीव भरून निघाली आहे ती अशी. मूळच्या ज्ञानेश्वरीच्या प्रती उतरून घेता घेता कालांतराने लेखकांच्या हस्तदोषांमुळे त्यात अशुद्ध व अबद्ध पाठ घुसले गेले व ते संशोधनाचे कार्य पैठणचे थोर साधु श्रीएकनाथ महाराज यांच्यासारख्या अधिकारी संतानी केले. वारकऱ्यांमध्ये ज्ञानेश्वरीची जी शुद्ध प्रत मानतात ती श्रीएकनाथ महाराज यांनी शुद्ध केलेली प्रत होय. हे शुद्धिकरणाचे काम ज्या भाद्रपद व।। ६ स ( कपिला षष्ठीच्या सुमुहूर्तावर) नाथांच्या हस्ते पूर्ण झाले तो दिवस अलिकडे महाराष्ट्रात ज्ञानेश्वरीजयंति म्हणून मोठ्या उत्साहाने साजरा केला जातो. ज्ञानेश्वरीच्या शेवटी दिलेल्या नाथांचा खालील सुप्रसिद्ध ओव्या ज्ञानेश्वरी वाचकांना सुपरिचित आहेतचः–

**श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनाम संवत्सरीं ।**
**एका जनार्दनें अत्यादरीं । गीताज्ञानेश्वरीप्रती शुद्ध केली ।।१।।**
**ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध ।**
**तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ।।२।।**
**नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका ।**
**ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ।।३।।**
**बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी ।**
**प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखन कामाठी संपूर्ण जाहली ।।४।।**

श्रीज्ञानदेवांच्या समाधीकालापासूनच आळंदीस मंडळी जमत असत. पण मध्यंतरी ज्ञानेश्वरांच्या नंतर धामभूमीचा काल गेल्याने आळंदी लोकांच्या दृष्टिआड होत चालली होती. श्रीनाथांनी ज्ञानेश्वरी व आळंदी पुनः फार भरभराटीस आणिली. असे म्हटल्यास

हरकत नाही की आळंदीचे माहात्म्य विशेष वाढविण्याचा जोराचा प्रथम प्रयत्न म्हणजे श्रीनाथांचाच.

**जोडोनियां दोनी हात । जगीं वाचवितो मात ॥१॥**
**एकदां जा रे अळंकापुरा । जन्म वेरझारा चुकवा ॥२॥ ए. म. ३५१२**

या कारणानेच 'ज्ञानाचा एका' अशी एक म्हण प्रचलित आहे. श्रीनाथांच्या वेळेस तर पंढरपूरचेही माहात्म्य फारच वाढले होते. श्रीएकनाथांनी आपल्या भागवतात तीन चार ठिकाणी त्याचा उल्लेख केला आहे. त्यांनी आपल्या अभंगांतही पंढरीचे वर्णन केले आहे. ते म्हणतात :–

**धन्य धन्य पंढरपूर । वाहे भीवरा समोर ॥१॥**
**म्हणोनि नेमें वारकरी । करती वारी अहर्निशीं ॥२॥ ए. म. ४११**

खंडोबा, भवानी, भैरव, मुंजाबा, मेसाई यांच्या त्या वेळेला यात्रा भरत असत. या बाह्य गोष्टीवर भर देणाऱ्या व क्लेशांनी भरलेल्या मार्गांपासून लोकास श्रीनाथांनी परावृत्त करून पंढरपूरास आणिले.

श्रीनाथांनी कीर्तनभक्ति विशेष वाढविली. नाथ स्वत: रोज कीर्तन करीत असत. नाथांनी कीर्तनाची जी मर्यादा घालून दिली आहे तीच वारकरी कीर्तनाचीही रूपरेषा होऊन बसली आहे.

**सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ।**
**सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥१॥**
**संतसंगें अनंतरंगें नाम बोलावें ।**
**कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें ॥२॥**
**भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।**
**प्रेमभरें बा वैराग्याच्या युक्ती विवराव्या ॥३॥**
**जेणेंकरूनि मूर्ति ठसावी अंतरीं श्रीहरिची ।**
**ऐशी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरची ॥४॥**

अद्वयभजनें अखंड स्मरणें वाजवि करटाळी ।
एका जनार्दनीं मुदत होय तात्काळीं ॥५॥ ए. म. १६७

श्रीनाथ स्वत: श्रीज्ञानदेव–नामदेवांप्रमाणे काशीपर्यंत यात्रा करून पंढरीचा महिमा थेट काशीपर्यंत पोचवून आले. श्रीनाथांचे भागवत मणिकर्णिकेच्या घाटावरच पूर्ण झाले.

## ४. श्रीतुकोबा व निळोबा यांचा काल

श्रीनाथांनी आपला देह ज्या साली ठेविला त्यानंतर सुमारे नऊ वर्षांनी इंद्रायणीच्या काठी पुण्यापासून १५ मैलांच्या अंतरावर असलेल्या देहू गांवी श्रीतुकाराम महाराज यांचा जन्म झाला, याच संतवीराने वारकरी मंदिरावर कळस चढविला असे आपल्या अभंगात बहिणाबाईने म्हटले आहे. स्वत: अत्यंत हाल-अपेष्टा सोसून स्वत:च्या संसारावर स्वहस्ते अग्नि ठेवून याच वारकरी शूराने हा पुण्यधर्म वाढता केला.

संसाराच्या नांवें घालूनिया शून्य । वाढता हा पुण्यधर्म केला ॥
हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ तु.म. ७७६

तुकाराम महाराजांना कळस म्हणण्याचे कारण, यांच्या-नंतर गेल्या तीनशे वर्षांत त्यांच्या उंचीस लागेल असला महात्मा वारकऱ्यात निर्माण झाला नाही. त्यांचे शिष्य पिंपळनेरकर निळोबा हे त्यास शोभण्यासारखेच शिष्य होते. पण गुरु ते गुरु व शिष्य ते शिष्य ! श्रीज्ञानदेवांच्या समाधिनंतर महाराष्ट्राच्या ऐहिक तेजास जो क्षय लागला होता त्याची तीनशे वर्षांत वाढ होत होत महाराजांच्या वेळेस त्या रोगाच्या उत्तर अवस्थेच्याही उत्तरभागास सुरुवात होऊ लागली होती असे म्हणा-वयास हरकत नाही. येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही

की तुकाराम महाराज यांच्या वयाचा निम्याहून अधिक भाग जाईतोपर्यंत यादवकुलदीपक, गोब्राह्मणप्रतिपालक व स्वातंत्र्य-प्रस्थापक शिवाजीमहाराज यांचा जन्मच झाला नव्हता. शिवाजी महाराजांच्या विसाव्या वर्षीच तुकाराम महाराज हे वैकुंठास गेले. तेव्हा महाराजांच्या कालाचा विचार करतांना मोंगली सत्तेचा शेवटचा भाग व स्वराज्यस्थापनेचा पूर्वभाग या संधि-कालाचा विचार करणे अवश्य आहे. ही गोष्ट येथे प्रामुख्याने सांगण्याचे कारण, पुष्कळ वेळा ही गोष्ट विसरली जाते. पारतंत्र्य हे सर्व दुःखाचे मूळ आहे. ताप भरला म्हणजे अंगाची आग, हातापायाची जळजळ, डोके दुखणे, ओकारी येणे वगैरे सुरू होते. त्याप्रमाणे एक पारतंत्र्य प्राप्त झाले की सर्व ऐहिक दुःखास प्रारंभ होतो. पारतंत्र्यात वरची सत्ता परधर्मीय असेल तर मग पुसावयासच नको. राष्ट्र राष्ट्ररूपाने जगते का मरते अशीच स्थिति होण्याची पाळी येते. तुकाराम महाराजांच्या वेळी अशीच स्थिति झाली होती. शास्त्रद्वारा धर्मरक्षणाचे काम ज्यांच्याकडे होते ते यवनांचे दास बनून त्यांच्या पदरी मनसबदाऱ्या पत्करून राहिलेले. अध्ययन, अध्यापन व आचरण द्वारा ज्यांच्याकडे रक्षा असावयाची ते ब्राह्मणही कालाबरोबर नीचांचे चाकर बनले, एवढेच नव्हे तर पोटाकरिता विधर्मी देवतांची उपासना करू लागले.

**सांडुनिया राम राम । ब्राह्मण करिती दोम दोम ।।** तु. म. २५५९

आपला पोशाखही त्यांनी परकीय लोकांस साजेल असाच बदलला.

**टिळे लपविती पाताडी । लेती विजारा कातडीं ।।** तु. म. २४७६

ही जर या दोन उच्च वर्णांची स्थिति तर ह्यांच्या पाऊलांवर पाऊल टाकीत जाणे एवढेच केवळ ज्यांचे काम त्या लोकांचे तर

विचारावयासच नको! धर्माच्या रक्षणास राजसत्ता नसली म्हणजे जितक्या विपन्न स्थितीस धर्म जाईल तितक्या विपन्न स्थितीस हिंदूधर्म त्यावेळी जाऊन पोहोचला होता व कोणी हातात दंड घेऊन या अधार्मिकास वठणीवर आणील असा पुरुष निर्माण होईल तर बरे असे वाटू लागले होते.

**काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनी पुढती वाटे लावूं ॥** तु. म. १३२२

पण जोपर्यंत असा कोणी निर्माण झाला नाही तोपर्यंत पाषांड-खंडन करून, धर्म जिवंत ठेवण्याचे काम आपणच केले पाहिजे या जाणिवेने श्रीतुकोबा यांनी ते काम आपलेसे केले व धर्मास उजाळा देण्याचे–रक्षण करण्याचे–काम जोराने चालू केले व इहलोकची यात्रा संपूर्ण होईपर्यंत ते काम अखंड चालविले. ते म्हणतात :–

**धर्माचें पाळण । करणें पाषांडखंडण ॥१॥**
**हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥२॥** तु. म. ९४८

• ० ०

**धर्म रक्षावयासाठी । करणें आटी आम्हांसी ॥** तु. म. ९४९

श्रीज्ञानदेव व श्रीएकनाथ यांच्याशी तुकाराम महाराजांच्या चरित्राची तुलना केल्यास दोघांच्या परिस्थितीत महदंतर होते असे दिसून येते. श्रीज्ञानदेव व श्रीएकनाथ द्विज होते तर तुकाराम-महाराज हे शूद्रवंशोत्पन्न. श्रीज्ञानदेवांस व नाथांस गुरुकृपा लहान वयातच प्राप्त झाली तर श्रीतुकोबांचे यांच्या अगदी उलट, लहान-पणीच वडील निवर्तले, थोरला भाऊ विरक्त बनून घर सोडून गेला व सर्व प्रपंचभार अल्पवयातच महाराजांच्या अंगावर पडला. प्रारब्ध अनुकूल होते तोपर्यंत सर्व ठीक चालले. पण काळ उलटला, व्यापारात तोटा येऊ लागला, मोठा दुष्काळ पडला व एक कुटुंब

व मुलगा अन्नाशिवाय मृत्युमुखी पडली व बुवांस प्रपंच नश्वर व दुःखबांदवडी आहे हे अनुभवाने पटले. वैराग्य प्राप्त झाल्यावर मात्र काय करावे यासंबंधाने त्यास फार विचार करण्याचे कारण पडले नाही. कारण तुकोबाराय यांच्या घरी नाथांच्याप्रमाणेच सात पिढ्या पंढरीची वारी चालत आली होती. म्हणून श्रीतुकोबांनी लगेच डोंगर गाठला व साधन करण्यास आरंभ केला. त्यात त्यांस यश येऊन श्रीपांडुरंगाचे दर्शनही झाले. मग तुकोबारायांनी स्वतःचा प्रपंच इतःपर करावयाचा नाही तर देवाचा प्रपंच थाटावयाचा असा निश्चय करून आपल्या वाटणीचे कागदपत्र नदीत बुडविले व लोकांस भगवत्पथाचा उपदेश करण्याचा तडाका लाविला. पंढरीची वारी व भगवद्‌भजन याशिवाय दुसऱ्या कोणत्याही साधनांचा श्रीतुकोबांनी अवलंब केला नाही. ते म्हणतातः–

**कोणी कांहीं तरी केली आचरणें । मज या कीर्तनेवीण नाहीं ।।** तु.म. ३४९३

याच स्वतःच्या अनुभवाने सिद्ध ठरलेल्या व सद्यःफल देणाऱ्या मार्गाचा त्यांनी जगास उपदेश केला.

**हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला ।** निळोबा १५६३

० ० ०

**जप तप यज्ञ लाजविली दानें । हरिनाम कीर्तन करुनिया ।।** रामेश्वरभट्ट ३

भगवद्‌भजन हे कसे समर्थ साधन आहे व पंढरपूरात विटेवर चैतन्याचा गाभा कसा उभा आहे हे तुकारामबुवांनी पुनश्च स्वतःच्या तपःसिद्धीने लोकांच्या निदर्शनास आणिले.

**घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ।।**तु.म.३९२१

तुकोबाराय यांचे कीर्तन अत्यंत रसाळ, हृदयाला जाऊन भिडणारे व स्वयंस्फूर्तीने तात्काळ केल्या जाणाऱ्या अभंगाने तर अतिशय

बहारीचे होई. श्रीतुकोबांनी अभंगरचना पुष्कळ केली. पैकी सध्या सुमारे साडेचार हजार अभंग त्यांचेच म्हणून प्रसिद्ध आहेत. फडावर माळयाची व गंगूकाकांची अशा दोन पाठांच्या गाथा मानल्या जातात व बाकीचे अभंग क्षेपक समजतात. बुवा स्वतः शुद्र, यामुळे त्यांना कीर्तन करून उपदेश करण्याची पात्रता नाही असे मानणारे एकवेळचे त्यांचे द्वेष्टे वाघोलीकर रामेश्वर भट्ट व ज्यांत क्षात्रतेज मुसमुसत होते व पुढे ज्यांनी स्वराज्य स्थापिले ते शिवाजी महाराज यापासून तोंतहत गंगाराम मवाळ, संताजी जगनाडे, कोंडोपंत लोहोकरे, मंबाजी बुवा, शिवबा कासार यांजपर्यंत सर्वांची श्रीतुकोबांचे कीर्तन ऐकत असतांना एकच वृत्ति होऊन जात असे.

**लुब्धली नादीं लागली समाधी । मूढ जन नरनारी लोका रे ।**
**पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधकां रे ॥** तु. म. २०८

जरी तुकारामबुवांनी हरिभक्तीचाच महिमा विशेष वाढविला तरी कर्ममार्गाचा त्यांनी उच्छेद केला असे बिलकुल नव्हे. त्यांनी ठिकठिकाणी एकाच परमेश्वरापासून चार वर्ण झाले, पण प्रत्येकाची कर्मे भिन्न आहेत व ती प्रत्येकाने अवश्य केली पाहिजेत असे सांगितले आहे.

**बोले वर्म जो चाले या विरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥** तु.म.२६९२

० ० ०

**शिखासूत्र तुझा गुंतला जमान । तंववरी तूं जाण श्रुतिदास ॥** तु. म. २२१९

पण हे पूर्वमीमांसकाप्रमाणे कर्मवादी नव्हतेच. अर्थात् कर्मही भगवदार्पण बुद्धीने नामाचे सहाय्य घेऊन करावे अशीच त्यांची शिकवणूक होती.

परकीय राज्यात संघटना करणे अवश्य व म्हणूनच त्यांनी 'सकळांसी येथें आहे अधिकार' अशा भजनमार्गावर जोर दिला. तुकाराम महाराजांना धर्माचे यथार्थ स्वरूप सांगण्याकरिता अतिशय तीक्ष्ण भाषा वापरावी लागली. पारतंत्र्यातील विनायक स्वास्थ्यांत धर्मातही कीड उत्पन्न होते. धर्माच्या नावावर पोट भरणारे कानफाटे, मलंग, डोईफोडे, गोसावी, मानभाव आणि शाक्त यांजवर तुकाराम महाराजांनी अतिशय कोरडे ओढले आहेत. स्वतः महाराजांना आपणास फार तीक्ष्ण बोलावे लागले याची जाणीव होती.

**तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊन बाण फिरे ॥** तु. म. ९४८

० ० ०

**निंदावें हें जग । ऐसा आंगा आला भाग ॥** तु. म. ३५३२

इहलोकी कीर्ति व परलोकी हित ज्याच्यात आहे असा भगवत्प्राप्तीचा पंढरपूरचा संप्रदाय त्यांनी वाढविला. ह्यात त्यांस अतिशय कष्ट व दुःख सोसावे लागले.कीर्तनाची कडक शिस्त अतिशय कसोशीने पाळावी लागली व वैराग्यही कडकडीत पाळावे लागले. उच्च जाति व महंत यांजकडून त्यांची छळवणूक झाली. प्रपंचाचे तर खोबरेच झाले. पण हे सर्व सोसूनही त्यांनी हरिभजनाने हे जग प्रकाशित केले. ते आपले स्वतःचे कार्य सांगतात :—

**संसाराच्या नांवें घालोनिया शून्य । वाढता हा पुण्य धर्म केला ॥**
**हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥** तु. म. ७७६

तुकाराम महाराज मनुष्याची स्थिति व अधिकार पाहून उपदेश करीत व परमार्थही डोळे उघडून करावयास सांगत.

**अधिकार तैसा करूं उपदेश ॥ साहे ओझें त्यास तेचि देऊं ॥** तु. म. ३५०४

० ० ०

**सुखें करावा संसार । न संडावे दोन्ही बार ।**
**दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥** तु. म. ३०७९

परमार्थ करतांना ते निक्षून सांगतात :–

**शुद्ध कसोनिया पाहावें । तरी रंगा न भुलावे ।।** तु. म. ३१३२

तुकाराम महाराजांच्या वेळेसही आषाढी, कार्तिक ह्या दोन्ही वाऱ्या मोठ्या प्रमाणात भरत असत.

**आषाढी निकट । आला कार्तिकीचा हाट ।। १ ।।**
**पुरे दोन्हीच बाजार । नलगे आणिक व्यापार ।। २ ।।** तु. म. ३२९

० ० ०

**दोन्हीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे ।।** तु म.२१३

तात्पर्य, तुकाराम महाराजांनी अशा रीतीने या कीर्तनभक्तीचा कळस करून लोकांस भजन– कीर्तनाचा संप्रदाय घालून दिला. महाराष्ट्रात जो वारकरी संप्रदाय इतका पसरला ते बहुतेक तुकाराम महाराजांच्याच पुण्याईचे फळ होय. वारकरी संप्रदायात तुकाराम महाराजांचे महत्त्व काय आहे. हे कळण्याची बरीच गमकेही आहेत. बहुतेक सर्व कीर्तने त्यांच्याच अभंगावर होतात. एखाद्या पदावर कथेकऱ्याने कीर्तन केल्यास त्याचा शेवट तरी निदान तुकारामबुवांच्या ' हेचि दान दे गा देवा ' ह्या प्रसिद्ध अभंगानेच होतो व जी संतभजने होतात ती 'ज्ञानोबा तुकाराम' अगर 'ज्ञानोबा माउली तुकाराम ' अशी होतात. म्हणजे ज्ञानदेवांच्या जोडीस एकदम तुकारामच येतात. इतकी मोठी चिरकाल टिकणारी कामगिरी आपल्या अभंगाद्वारा तुकाराम महाराजांनी केली. आजही तुकाराम महाराजांचे अभंग हजारो लोकांस भवदुःख विसरण्यास लावून भगवत्सुखाचा आस्वाद घेण्यास प्रवृत्त करीत आहेत.

बहिणाबाई ह्या तुकाराम महाराजांच्या शिष्यांपैकी एक श्रेष्ठ शिष्या होत्या. त्यांना तुकाराम महाराजांच्या संगतीचा लाभ व साक्षात् अनुग्रह मिळाला असल्यामुळे त्यांनी केलेल्या अभंगांना

निळोबाराय व महीपतीबुवा ह्या त्यांच्या शिष्यांच्या अभंगांपेक्षा अधिक मोल सहजच प्राप्त होते. विशेषतः तुकाराम महाराजांना बाबाजी चैतन्यापासून झालेला अनुग्रह बहिणाबाईंनी ज्या अभंगांत वर्णन केला आहे त्याची माहिती खुद्द तुकाराम महाराजापासून त्यांना मिळाली असल्याचा संभव आहे. त्यांची समाधि शिऊर-गावी आहे.

तुकाराममहाराजांचे मुख्य चौदा टाळकरी होते. पण त्यांचा संप्रदाय वाढविणारा असा शिष्य याहून निराळाच होता. तो म्हणजे पिंपळनेरकर निळोबाराय होत. पिंपळनेर हे नगर जिल्ह्यात आहे. पण पुणे जिल्ह्यात असणाऱ्या शिरूर गावी त्यांचा जन्म झाला. हे जातीचे ब्राह्मण होते व काही कालपर्यंत कुळकर्णपण चालवीत होते. पण एके दिवशी स्नानसंध्या करीत असता सरकारदरबारचे आमंत्रण आले व त्यांस तसेच जावे लागले. तेव्हा इतःपर नोकरी करावयाची नाही असा निश्चय करून, घरादारावर तुळशीपत्र ठेवून ते जे बाहेर पडले ते यात्रा करीत देहूस आले. तेथे श्रीतुकोबा-राय यांचे चिरंजीव नारायणबुवा यांची गाठ पडली. त्यांनी दोघांनी बरोबर यात्रा केल्या, पण समाधान होईना. सरतेशेवटी श्रीतुकोबाचा प्रसाद व्हावा एवढ्याचकरिता त्यांनी धरणे घेतले. ते बेचाळीस दिवस काही एक न खाता पडून राहिले व मग त्यांस तुकाराम महाराजांनी दर्शन देऊन उपदेश दिला.

**निळा म्हणे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळ जना ॥** निळोबा ८८४

यानंतर निळोबांनी अभंग केले व संप्रदायाची कीर्तन-भजनद्वारा फारच उत्तम सेवा केली. पुष्कळ लोकांचे त्यांच्या अभंगाकडे अजून जितके लक्ष जावयास पाहिजे तितके गेले नाही. त्यांनी तीनशे श्लोकात

श्रीतुकारामस्तुति वर्णिली आहे. त्यांचे अभंग सुमारे १६०० प्रसिद्ध आहेत. त्यांच्या अभंगाची भाषा अगदी अर्वाचीन आहे व वाणीत प्रसाद आहे. विशेषतः त्यांचे गौळणीचे अभंग तर फारच अप्रतिम आहेत. ते वाचले म्हणजे गुरूंस शोभणारा शिष्य लाभला असे स्वाभाविकच उद्गार तोंडातून निघतात.

## ५. यानंतरचा तीनशे वर्षांचा काल

यानंतरचा हा वारकरी पंथाच्या कालाचा शेवटचा भाग. यात अनुभवी, संप्रदायाची सेवा उत्तमरीतीने करणारे असे पुष्कळसे संत निर्माण झाले. पण महिपतीबुवा कांबळे ताहराबादकर (शके १६३७–१७३२) यांच्याशिवाय ग्रंथलेखक असा नाव घेण्या-सारखा कोणी झाला नाही. त्यांनीच संतलीलामृत, भक्तलीला-मृत वगैरे ग्रंथ लिहून साधुचरित्रे सविस्तर लिहून काढली. निळोबा-रायानंतर शंकरस्वामी शिऊरकर यास उपदेश प्राप्त झाला. त्यांची समाधि ज्या गावी बहिणाबाईंची समाधि आहे त्याच औरंगाबाद-जवळ असणाऱ्या शिऊरगावी आहे. शंकरस्वामी यांजपासून मल्लाप्पा वासकर (शके १६३१–१७२१) यांस उपदेश प्राप्त झाला. ह्यांची समाधि आळंदी येथे आहे व यांनीच प्रथम फड काढला. प्रथम फड काढला याचा अर्थ पूर्वी फड बिलकुल नव्हते असा नव्हे. नाथांच्या ‘ चिरंजीवपदांत ’ पुढील उद्गार आहेत :-

न मांडी स्वतंत्र फड । अंगीं अहंता येईल वाड ।। ए. म. ३९६५

यावरून नाथांच्यापूर्वी भजनाचे फड असावेत. पण नाथ व तुकोबा यानंतर लुप्त झालेल्या फडास यांनीच प्रथम चालना दिली असावी. वासकरांतून प्रथम देहूकर फुटले व त्यांनी स्वतंत्र

फड काढला. हल्ली वारकऱ्यांत प्रमुख असे चार पाच फड आहेत. पण त्यांत वासकरांस अग्रस्थान आहे व ते योग्यही आहे. कारण गोपाळबुवा हे जरी तुकोबाचे पणतु होते तरी त्यांची मांसवंशाची परंपरा होती, 'विद्यापरंपरा' मल्लाप्पाकडेच आली होती.

यानंतर गेल्या तीनशे वर्षांत समाजाच्या दृष्टीने घडून आलेली मोठी गोष्ट म्हणजे 'पालख्यांच्या सोहळ्याची' वाढ. श्रीज्ञानेश्वर महाराज यांच्या समाधीकालानंतर श्रीनामदेव, गोरोबा, नरहरी सोनार व पुढील काळात श्रीएकनाथ, तुकाराम, निळोबा, शंकरस्वामी शिऊरकर, मल्लाप्पा वासकर इत्यादि थोर भगवद्भक्तांनी पंढरपूरच्या वारीचा क्रम वाढवीत नेला. पालख्यांचा सोहळा दीडशे वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या हैबतरावबाबा आरफळकर (जि. सातारा) यांनी विशेष वाढविला. यांचा जन्म सरदारकुलांत झालेला. हे ग्वाल्हेरहून परत येत असताना त्यांना चोरांनी गाठले व एका गुहेत कोंडले. तेथे राहिले असता ज्ञानेश्वरमहाराजांचा त्यांनी धावा केला. श्रीज्ञानदेव त्यांच्या धाव्यास पावले. चोरांच्या टोळीच्या नासकास मुलगा झाला व त्या आनंदाप्रीत्यर्थ बाबांची सुटका झाली. झाले ! बाबांच्या मनाने उलट खाल्ली व ते जे निघाले ते थेट आळंदीस येऊन राहिले, परत ग्वाल्हेरास गेलेच नाहीत. आळंदीत समाधीसमोर रात्री शेजारतीपासून तो सकाळी दूधारतीपर्यंत भजनाचा त्यांचा नियम असे. वारकऱ्यांत जी भजनीमालिका आज प्रसिद्ध आहे ती त्यांचीच आहे. बाबांच्यापूर्वी श्रीज्ञानदेवांच्या पादुका गळ्यात घालून पंढपूरला नेत असत. त्या पादुका पालखीत घालून, दिंड्या वगैरे भजनाचा सोहळा बाबानीच विशेषत्वाला आणला. हल्ली आषाढीला जो पालख्यांचा सोहळा दिसून येतो ते यांच्या परिश्रमाचे व कल्पनेचे फळ

होय. प्रथम श्रीज्ञानदेव व तुकोबा यांच्याच पालख्या निघत; बाकीच्या पालख्या तदनंतरच्या आहेत. हैबतरावबाबांना खंडोजीबाबा नावाच्या महात्म्याची या कामी चांगली मदत मिळाली होती. त्यांची समाधी पुण्यास लकडीपुलाजवळील वाडीत नदीकाठी आहे

खंडोजीबाबांचे एक टाळकरी शेडगेबाबा होते. त्यांनी पालख्यांचा सोहळा वाढविण्याच्या कामी बरीच खटपट केली. त्यांची समाधि नारायण पेठेत लक्ष्मीरोडवर शेडगे विठ्ठल मंदिरात आहे. श्रीज्ञानदेवांच्या पालखीच्या सोहळ्यास पूर्वी हत्ती, घोडे वगैरे लवाजमा श्रीमंत राजेसाहेब (औंध) यांजकडून येत असे. या खर्चास सहाय्य त्या त्या वेळचे राजे व श्रीमंत पेशवे सरकार करीत असत. पुढे कंपनी सरकारचा अंमल सुरू झाल्यावरही खर्चाची तरतूद सरकारकडून होत असे. सरकारने इ. स. १८५२ मध्ये पंचकमिटी स्थापन करून त्या कमिटीच्या नियंत्रणाखाली ज्ञानेश्वर महाराजांच्या पालखीची व्यवस्था केली. ज्ञानेश्वर महाराजांच्या पालखीबरोबर सुमारे एक लाखाच्यावर लोकसमुदाय असतो. त्या व्यवस्थेसाठी सरकारतर्फे आरोग्यखात्याची डॉक्टर मंडळी, पिण्याच्या पाण्याची गाडी, पोलीस ह्यांची योजना होत असते. हल्ली पालखीकरिता दोन घोडे, तंबू, नैवेद्य यांची व्यवस्था अंकलीकर शितोळे यांच्याकडून होत असते व वाखरीपासून श्रीज्ञानदेवांच्या पादुका गळ्यात घालून पंढरपुरात जाण्याचा यांचा मान असे.

एकोणीसाव्या शतकाच्या जवळ जवळ अखेरपर्यंत श्रीज्ञानोबा व तुकोबा या दोघांच्याच पालख्या निघत असत. हल्ली ज्ञानोबा तुकोबांच्या पालख्याप्रमाणेच निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई, जनार्दनस्वामी, एकनाथ महाराज, सांवता माळी,

रामदासस्वामी इत्यादि साधूंच्या पालख्या श्रीपांडुरंगाच्या दर्शनासाठी आषाढी वारीच्या वेळी पंढरीला येत असतात. ही पालख्यांची संख्या तूर्त सुमारे ५० आहे.

सर्व पालख्या निरनिराळ्या गावाहून निरनिराळ्या रस्त्याने येऊन शेवटी मात्र पंढरपूराच्या अलिकडे पाच मैलावर असलेल्या वाखरी गावी एकत्र होतात. त्या 'ज्ञानबा तुकाराम' च्या गजरात पंढरपूरात आषाढ शु।। १० च्या दिवशी रात्री १२ च्या सुमारास मोठ्या थाटाने प्रवेश करतात. त्यावेळी सर्व पालख्याबरोबर सुमारे २–२।। लाखापर्यंत वारकऱ्यांचा समुदाय असतो. पंढरी टाळ, मृदंग, विणे यांच्या आवाजाने व 'ज्ञानोबा तुकाराम' या भजनाने दुमदुमून जाते. हा सर्व देखावा अवर्णनीय व अलौकिक असा असतो. शिस्तबद्ध व भगवंताच्या प्रेमाने एकत्र आलेली ही महाराष्ट्रातील सर्व थरातील लहानथोर मंडळी नाचत बागडत पंढरीनाथाच्या गावाला येते. त्यावेळचें दृश्य हे वारकरी पंथाचे सर्वांत प्रमुख असे वैशिष्टय आहे. महाराष्ट्रातीलच नव्हे तर परप्रांतातील व परदेशातील ज्या ज्या मंडळींनी हा पालखीच्या सोहळ्याचा आनंद अनुभवला त्या त्या मंडळींनी ते दृश्य पाहून असे दृश्य जगताच्या पाठीवर इतरत्र कोठेही पाहावयास मिळत नाही असे धन्यतेचे उद्‌गार काढले आहेत.

मध्यंतरीच्या काळात वारकरी संप्रदायाची सेवा करणाऱ्यामध्ये बाबांच्याशिवाय पुंडलीकबुवा, जळोजीमलोजी (बंधुद्वय) प्रल्हादभाऊ बडवे, ठाकोरदास बुवा, बाबा पाध्ये, मार्तंडमामा पाइटकर, मार्तंडबापू आळंदीकर, वासुदेवबुवा देहूकर, सखारामबुवा अमळनेरकर, बाबा अझरेकर, चार्तुमासेबुवा, गंगूकाका, भानुदासमहाराज, लक्ष्मणबुवा वाखरीकर, गंगागीर महाराज वगैरे जुनी

मंडळी होऊन गेली. अगदी अलीकडची नाव घेण्यासारखी व ज्यांनी संप्रदायाची उत्तम सेवा केली अशी मंडळी म्हणजे भाऊसाहेब काटकर, नानामहाराज साखरे व विष्णुबुवा जोग ही होत. या शेवटच्या त्रयीने ज्ञानेश्वरी विशेष प्रचारात आणली असे म्हटल्यास हरकत नाही. या त्रयीचे ज्ञानेश्वरीवर अप्रतिम प्रभुत्व होते. भाऊसाहेब काटकर हे सोलापूरचे राहणारे. त्यांस तर संस्कृताचा गंधही नव्हता. पण असे सांगतात की त्यांची कीर्तने ऐकण्याकरिता पुण्याहून देहूस न्यायमूर्ति रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर वगैरे मंडळी जात असत. भाऊसाहेबांचे कीर्तन ऐकलेली मंडळी अजूनही हयात आहेत व अजून त्यांचे शब्द कानात गुणगुणतात असे ते म्हणतांना ऐकू येते. नानामहाराज हे पुण्यातच राहात. त्यांच्यामुळेच ज्ञानेश्वरीचा अर्थ छापून निघून त्याचा वारकरी मंडळीत प्रसार झाला. विष्णुबुवा जोग यांचे ज्ञानेश्वरीवर तर प्रभुत्व होतेच, पण त्यांचे गाथावाङ्मयावरही मोठे प्रभुत्व होते. त्यांनी तुकाराम महाराज यांच्या समग्र गाथ्याचे मराठी भाषांतर प्रथमच प्रसिद्ध केले. त्यांनी गाथ्याची विषयवार वाटणी करून तो आवटे छापखान्यात प्रसिद्ध केला व त्याचीच नक्कल पुढे निर्णयसागर छापखान्याने उचलली. भाऊसाहेब काटकर व विष्णुबुवा जोग यांनी कीर्तनद्वाराही वारकरी संप्रदायाची फारच मोठी सेवा केली.

हल्ली वारकरी संप्रदायात जी शिकलेली मंडळी दिसते ती विष्णुबुवा जोगमहाराज यांच्या ज्ञानेश्वरी व तुकारामगाथा यावरील उत्कृष्ट निरुपणामुळे व त्यांनी स्थापन केलेल्या आळंदी येथील वारकरी शिक्षण संस्थेमुळे. पांढरपेशा वर्गातील बरीचशी सुशिक्षित

मंडळी त्यांच्यामुळे या मार्गाकडे वळली असे म्हटल्यास हरकत नाही. या त्रयीनंतर या संप्रदायाची सेवा बंकटस्वामी (राहणार निनगुर) व केशवराव महाराज देशमुख (राहणार पुणे) यांनी केली. ह. भ. प. बंकटस्वामी यांनी संपूर्ण महाराष्ट्र व मोंगलाई-तील खेडोपाडी हिंडून वारकरी पंथाचा फार मोठा प्रसार केला. ह. भ. प. केशवराव महाराज यांनी पुण्यातच रोज ज्ञानेश्वरी सांगण्याचे व्रत अखंड दोन तपांवर चालविले. नारदभक्तिसूत्रावर ओवीबद्ध टीकाही त्यांनी लिहिली आहे.

हल्ली वारकऱ्यात वासकर, देहूकर, आजरेकर, गंगुकाका, ठाकूरबुवा वगैरेंचे प्रमुख फड आहेत. आषाढीस तीन चार लाख कार्तिकीस दोन लाख समुदाय पंढरीस जमत असतो. आळंदीची यात्राही वाढत आहे. या यात्रेस वारकरी कोल्हापूर, सातारा, सोलापूर, नगर, पुणे, नाशिक, खानदेश, नागपूर, वऱ्हाड, मोंगलाई, बंगलोर, कर्नाटक, त्रिचनापल्ली येथून येत असतात, इतका यात्रेचा प्रसार झाला आहे. वारीच्या उत्पन्नाचा व येणाऱ्या वारकऱ्यांच्या संख्येचा तक्ता पुढे दिला आहे.

पंढरपूर–आळंदीप्रमाणेच त्र्यंबकेश्वर येथे निवृत्तिनाथांची पौष वद्य ११ स, सासवड येथे सोपानदेवांची मार्गशीर्ष वद्य ११ स, मेहुण व एदलाबाद येथे मुक्ताबाईंची वैशाख वद्य ११ स, देहू येथे तुकाराम महाराजांची फाल्गुन वद्य २ स, पैठण येथे एकनाथ महा-राजांची फाल्गुन वद्य ६ स व पिंपळनेर येथे निळोबारायांची फाल्गुन शुद्ध २ स अशा लहान मोठ्या यात्रा भरत असतात. त्यात पैठणची यात्रा सर्वांत मोठी. तेथे लाखावर समुदाय गोळा होतो.

-----

# ४. श्रीपांडुरंग उपासकांतील चार संप्रदाय

आतापर्यंत वारकरी संप्रदायाच्या आरंभाचा व वाढीचा जो विचार केला त्यावरून असे दिसून आले की या संप्रदायात चार संप्रदायांचा अंतर्भाव झालेला आहे. ते संप्रदाय येणेप्रमाणे :–(१) चैतन्य, (२) स्वरूप, (३) आनंद व (४) प्रकाश.

(१) **चैतन्य संप्रदाय** :– या संप्रदायात दोन भेद आहेत. (अ) एकाचा 'रामकृष्णहरि' हा षडाक्षरी मंत्र आहे. (आ) दुसऱ्याचा 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा द्वादशाक्षरी मंत्र आहे. पहिल्याची माहिती देणारे तुकाराम महाराज व पिंपळनेरकर निळोबाराय यांचे पुढील अभंग आहेत :–

**सत्यगुरुरायें कृपा मज केली। परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥१॥**
**सांपडविलें वाटें जातां गंगास्नाना। मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥२॥**
**भोजना मागती तूप पावशेर। पडिला विसर स्वप्नामाजीं ॥३॥**
**कांहीं कळे उपजला अंतराय। म्हणोनियां काय त्वरा झाली ॥४॥**
**राघव चैतन्य केशव चैतन्य। सांगितली खूण माळिकेची ॥५॥**
**बाबाजी आपुलें सांगितलें नाम। मंत्र दिला रामकृष्णहरि ॥६॥**
**माघ शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार। केला अंगीकार तुका म्हणे ॥७॥तु.म.३७०९**

० ० ●

**मुख्य महाविष्णु चैतन्याचें मूळ। संप्रदाय फळ तेथोनियां ॥१॥**
**हंसरूपी ब्रह्मा उपदेशी श्रीहरी। चतुःश्लोकी चारी भागवत ॥२॥**
**तें गुज विधाता सांगे नारदासी। नारदें व्यासासी उपदेशिलें ॥३॥**
**राघवचैतन्य केलें अनुष्ठान। त्यासी द्वैपायनें कृपा केली ॥४॥**
**कृपा करूनि हस्त ठेवियेला शिरीं। बोध तो अंतरीं ठसावला ॥५॥**
**राघवा चरणीं केशव शरण। बाबाजीशीं पूर्ण कृपा त्याची ॥६॥**
**बाबाजीनें स्वप्नीं येऊनि तुकयाला। अनुग्रह दिला निजप्रीति ॥७॥**

**जगद्गुरु तुका अवतार नामयाचा । संप्रदाय सकाळांचा तेयूनियां ॥८॥**
**निळा म्हणे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळ जनां ॥९॥ निळोबा ८८४**

वरील अभंगात उल्लेखित केलेल्या राघव चैतन्य, केशव चैतन्य व बाबाजी ह्या तीन व्यक्ती होत्या का दोन होत्या यासंबंधी बरीच चर्चा झाली आहे व आजही होत आहे. वेगवेगळ्या वेळी वेगवेगळी मते मांडली गेली आहेत. कै. पांगारकर प्रभृति ह्या तीन व्यक्ती समजत. पण मध्यंतरीच्या संशोधनाने केशव चैतन्य हेच बाबाजी असे ठरवले. यामुळे या अभंगात दोनच व्यक्तींचा उल्लेख आहे असे समजले जाई. परंतु अलीकडील झालेल्या संशोधनावरून राघव चैतन्य, केशव चैतन्य व बावाजी चैतन्य ह्या व्यक्ती पुनः तीन निरनिराळ्या होत्या असे दिसते. राघव चैतन्य यांची समाधि कल्याणगुलबर्ग्याजवळ आळंदगुंजोटीस आहे, केशव चैतन्य यांची समाधि पुणे जिल्ह्यातील ओतूरगावी आहे व बाबाजी चैतन्य यांची समाधि मन्याहाळ येथे आहे असे इतिहाससंशोधक श्री. बेंद्रे यांचे म्हणणे आहे. या बाबतीत अजून संशोधन चालू आहे.

दुसऱ्याच्या माहितीचा अभंग पुढील आहे :–

**आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा । मच्छिंद्र तयाचा मुख्य शिष्य ॥१॥**
**मच्छिंद्राने बोध गोरक्षासी केला । गोरक्ष वळला गहिनीप्रती ॥२॥**
**गहिनीप्रसादें निवृत्तिदातार । चोजविलें सार ज्ञानदेवा ॥३॥ ज्ञा. म.**

हीच परंपरा श्रीज्ञानदेवांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटीही दिली आहे. बहुतेक सर्व वारकरी संप्रदाय चैतन्यसंप्रदायातलाच आहे.

(२) **स्वरूप संप्रदाय** :–याचा 'श्रीराम जयराम जय जय राम' असा त्रयोदशाक्षरी मंत्र आहे. यातही दोन भेद आहेत. (अ) रामानुजीय. हे कपाळावर तांबडी रेषा लावतात. यात मुल्हेर-

कर, सखारामबुवा अंमळनेरकर व भानुदासबुवा बेलापूरकर वगैरे मंडळी येतात. (आ) रामानंदी. हे पांढरी रेषा लावतात. यात रामानंद, कबीर, कमाल वगैरे मंडळी येतात.

(३) **आनंद संप्रदाय** :—या संप्रदायाचा मंत्र त्र्यक्षरी 'श्रीराम' अथवा दोन अक्षरी 'राम' असा आहे. यात नारद, वाल्मीकि, सेना न्हावी वगैरे मंडळी येतात.

(४) **प्रकाश संप्रदाय** :—याचा मंत्र 'ॐ नमो नारायण' असा आहे यात श्रीएकनाथ महाराज येतात.

**जो निर्गुण निराभास । जेथून उद्‍भव शबलब्रह्मास ।**
**आदिनारायण म्हणती ज्यास । तो सर्वांस आदि गुरु ॥१॥**
**तयाचा ब्रह्मा अनुग्रहीत । ब्रह्मा अत्रीसी उपदेशीत ।**
**अत्रीपाद प्रसादीत । श्रीअवधूत दत्तात्रेय ॥२॥**
**दत्तात्रेय परंपरा । सहस्त्रार्जुन यदु दुसरा ।**
**जनार्दनशिष्य तिसरा । केला खरा कलियुगीं ॥३॥**
**जनार्दनकृपेस्तव जाण । समूळ निरसलें भवबंधन ।**
**एका जनार्दनीं शरण । झाली संपूर्ण परंपरा ॥४॥** ए. म. १८९८

---

# ५. वारकऱ्यांस मान्य देव, संत, ग्रंथ व आचारविचार

या पंथात मान्य असलेले (१) देव, (२) संत, (३) ग्रंथ व (४) आचारविचार यासंबंधी विचार करू.

(१) **देवः**— या पंथास मान्य असलेल्या दैवतांचा विचार करता या पंथास श्रीपंढरीनाथ हे एकच दैवत मान्य आहे. श्रीपंढरीनाथ हे श्रीकृष्णाचे बालरूप आहे.

गीता जेणें उपदेशिली । ते हे विटेवरी माउली ।। तु. म. ६७९

० ० ०

द्वारकेचें केणें आलें याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ।।तु.म.३६६

० ० ०

पांडुरंग बाळमूर्ती । गाईगोपाळ सांगाती ।
येऊनियां प्रीती । उभे समचि राहिले ।। तु. म. ३०३

० ० ०

नागर गोडे बाळरूप । तें स्वरूप काळीचें ।।१।।
गाई गोपाळांच्या संगें । आलें लागे पुंडलीका ।।२।। तु. म. ३०२

यामुळे वारकरीपंथ कृष्णोपासक आहे. पण येथे लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे की या पंथातील संतांची या दैवताच्या स्वरूपाविषयीची कल्पना फार उदात्त व व्यापक आहे. वारकरी पंथ हा अद्वैत ज्ञानावर अधिष्ठित अशा भक्तीचा प्रचार करणारा पंथ आहे. यामुळे पंढरीनाथाच्या उपासनेत आपणास अनेक दैवतांच्या उपासनांचा समन्वय झालेला दिसतो. राम, शिव, दत्त इत्यादि दैवतांची उपासना करणारे उपासक वारकरीपंथात आहेत. वास्तविक श्रीएकनाथमहाराज हे दत्त परंपरेतील होत. परंतु त्यांनी दत्ताइतकेच कृष्णाच्या व रामाच्या उपासनेचे महात्म्य गायिले आहे हे वारकऱ्यात मान्य असलेले त्यांचे एकनाथी भागवत व भावार्थ रामायण या ग्रंथांवरून सिद्ध होते. वारकऱ्यात श्रावणातील कृष्णाष्टमी व चैत्रातील रामनवमी हे उत्सव फार मोठ्या विस्तृत प्रमाणावर होत असतात.

दुर्जनांचा येणें करूनि संहार । पूर्ण अवतार रामकृष्ण ।। तु. म. २४

याहिपेक्षा विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या पंथात हरि व हर यांचे ऐक्य प्रतिपादिलेले आहे व त्या ऐक्याची मूर्तिच जणूकाय विटेवर उभे असलेले श्रीपांडुरंग हे आहेत.

रूप पाहतां तरी डोळसु । सुंदर पाहतां गोपवेषु ।
महिमा वर्णितां महेशु । जेणें मस्तकीं वंदिला ॥१॥ ज्ञा. म. ८९

श्रीपांडुरंगांनी आपल्या मस्तकावर शिवास धारण केलेले असल्यामुळे या पंथात शैव व वैष्णव असे तंटे बिलकुल नाहीत.

तुका म्हणे भक्तिसाठीं हरिहर । तु. म. २२७८

० ० •

हरिहरा भेद । नाहीं नका करूं वाद ॥ तु. म. २९४

० • ०

तरी शंभु कां श्रीहरी । पढियंता होय ॥ ज्ञाने. १७-२०१

जितकी एकादशी वारकऱ्यास आवश्यक तितकाच सोमवार अथवा महाशिवरात्रही आवश्यक.

व्रत करा एकादशी सोमवार । तु. म. ३६३८

० ० •

ऐक माझे भक्तीचें चिन्ह । माझ्या पर्वांचें अनुमोदन ।
करी करवी आपण । दीनोद्धरण उपावो ॥
पर्वविशेष भागवतधर्मी । नृसिंहजयंती रामनवमी ।
वामनजयंती जन्माष्टमी । उत्तमोत्तमीं शिवरात्र ॥
वैष्णवांसी शिवरात्री विरुद्ध । हें बोलणें अतिअबद्ध ।
सकळ पुराणीं अविरुद्ध । व्यास विशुद्ध बोलिला ॥

ए. भा. ११-१२५४ ते ५८

श्रीतुकाराम महाराज यांचे सिंगणापूरच्या महादेवास उद्देशून केलेले चार 'कावडयाचे' अभंग प्रसिद्धच आहेत. वारकऱ्यांच्या देव्हाऱ्यात वैकुंठाधिपति रमेश्वराचा जितका मान तितकाच कैलासाधिपति पार्वतीपतीचा मान आहे. याचे दुसरे कारण असे आहे की चैतन्य संप्रदायातील ज्या नाथपंथाचे वर दिग्दर्शन केले आहे व ज्यात श्रीनिवृत्तिनाथ-ज्ञानदेव होऊन गेले त्या पंथाचे आद्यप्रवर्तक

श्रीत्रिपुरारी होत. तात्पर्य, श्रीशंकर व श्रीविष्णु या दोहोंचे ऐक्य दाखवणारे श्रीमंत पंढरीनाथ हे या पंथातील मुख्य दैवत होत.

तेथे एक गोष्ट अवश्य सांगितली पाहिजे. ती ही की, वारकरी संप्रदायातील साधूंचे ग्रंथ वाचले असता असे दिसून येईल की हे साधु सश्रद्ध खरे, पण बुद्धीची कास न सोडणारे असे आहेत. असले साधु श्रीपांडुरंगाचे, तो एक भुते घालवणारा म्हणून भजक बनतील ही गोष्ट अशक्य आहे. सोलापूर गॅझिटियरमध्ये लेखकाने ' नरसोबाच्या वाडीप्रमाणे येथे भुते निघतात व हा देव भुते घालविणारा व म्हणून येथील चालीरीती निराळ्या असली विधाने केली आहेत. (पान ४७३, नोट २ पहा.) पण ती निराधार आहेत. देवऋषीपणा हा वारकऱ्यास कितपत मान्य आहे हे तुकोबांच्या तत्संबंधी पुढील उद्‌गारावरून उघड होणार आहे.

**देव्हारा बैसोनि हालविती सुपें । तया नराहातीं चोट आहे ।।** तु. म. २५३७

• ० ०

**तुका म्हणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ।।** तु. म. २५४०

अंगारे धुपारे करणारे हे देवाचे भक्तच नव्हेत असे या संतांनी अनेक वेळी स्पष्ट सांगितले आहे.

(२) **संत** :–या पंथास मुख्यतः मान्य अशी अर्वाचीन संतमंडळी म्हणजे निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय, यांच्या पूर्वी अगर समकाली जे जे संत होऊन गेले त्यांपैकी ज्यांचा ज्यांचा यांच्या अभंगांत उल्लेख येतो ते सर्व पूज्यच मानले जातात व त्यांचे अभंगही यांच्या अभंगाप्रमाणेच प्रमाणभूत म्हणून कीर्तनप्रवचनातून घेतात. व्यास, शुक, नारद, शंकराचार्य, चांगदेव, सेना न्हावी, नरहरी सोनार, सांवतामाळी,

चोखामेळा, बहिणाबाई, जनाबाई, कान्होबा, कबीरदास, सूरदास, तुलसीदास, मीराबाई इत्यादि संत वारकऱ्यास पूज्य आहेत.

(३) ग्रंथ :– वैदिकांस प्रमाणभूत असणारे वेद, भगवद्गीता, श्रीमद्भागवत, ब्रह्मसूत्रे, स्मृति वगैरे संस्कृत ग्रंथ वारकरीपंथात प्रमाणभूत मानतात. ज्या मराठी ग्रंथांचे वाचन मोठ्या प्रमाणावर केले जाते ते ग्रंथ म्हणजे ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, रुक्मिणीस्वयंवर व ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय यांच्या अभंगगाथा इत्यादि होत. ब्राह्मणाच्या संध्या उपासनादि नियमाप्रमाणे वारकरी ज्ञानेश्वर महाराजांचा हरिपाठ नित्य पठण करतात. वर निर्दिष्ट संतमंडळीचे इतर ग्रंथही वारकरी पूज्य व प्रमाणभूत मानतात.

येथे एका गोष्टीचा स्पष्ट खुलासा केला पाहिजे. वारकरी पंथातील मंडळीस प्राकृत साधूंतील उपरिनिर्दिष्ट साधूंचेच ग्रंथ प्रमाणभूत आहेत असे म्हटल्यावर त्यावर एक प्रकारे अनुदारतेचा आरोप येण्याचा संभव आहे. विशेषतः हा आरोप रामदासी संप्रदायातील मंडळीकडून केलेला पुष्कळ वेळा ऐकू येतो. त्यांचे म्हणणे असे की वर निर्दिष्ट केलेल्या संतांप्रमाणेच इतरही संत असताना त्यांचे ग्रंथ वारकरी प्रमाणभूत का मानीत नाहीत ? विशेषतः महाराष्ट्राच्या दृष्टीने बोलावयाचे म्हणजे रामदासांच्या ग्रंथातील वाक्ये वारकरी कीर्तनात प्रमाण म्हणून का घेत नाहीत ? यास थोडक्यात उत्तर असे आहे की यात थोडा समजुतीच्या घोटाळ्याचा भाग आहे. वारकरी संप्रदाय हा उपरिनिर्दिष्ट संतांखेरीज इतर कोणास संतच म्हणावयास तयार नाही, असला अज्ञ व हट्टी तो समाज आहे असे कोणासही म्हणता येणार नाही. वारकरी

कीर्तनातून दृष्टांतादाखल सर्व संतांची चरित्रे सांगण्यात येतात. आता, संप्रदायातील मंडळी आपल्या संप्रदायाबाहेरचे ग्रंथ प्रमाण म्हणून कीर्तनात घेत नाहीत याचा अर्थ ती मंडळी ते ग्रंथ कुचकामाचे समजतात असे नव्हे, तर ते आपल्या ग्रंथाची व वाङ्मयाची-तात्पर्य संप्रदायाची-जोपासना फारच उत्तमरीतीने करू इच्छितात एवढेच.

चातुर्वर्ण्यव्यवस्था वाईट किंवा चांगली हा प्रश्न कसाही सुटो, पण छापखाने नव्हते त्याकाळी एका ब्राह्मण जातीकडेच वेदाध्ययन होते म्हणून वेद टिकले असे शार्मण्यदेशीय गार्बेसाहेबासही कबूल करावे लागले आहे. सर्वांचें काम म्हणजे कोणाचेच नव्हे या एका आंग्ल भाषेतील म्हणीप्रमाणे एका विशिष्ट वाङ्मयाची वाढ व जोपासना एका संप्रदायाने घेतली नाही तर ते कालांतराने नाहीसे होत जाते. तसा प्रकार होऊ नये म्हणून या संप्रदायी मंडळींनी स्वसंरक्षणार्थ आपणास एक प्रकारचे बंधन घालून घेतले एवढेच. वारकरी संप्रदायांत अशी चाल रूढ आहे म्हणूनच त्यात अशी कित्येक मंडळी आज आहेत की ज्यांस संपूर्ण ज्ञानेश्वरी व गाथा पाठ आहेत. आपल्या संप्रदायातील प्रमाणभूत ग्रंथ संपूर्ण मुखोद्-गत आहेत अशी मंडळी इतर संप्रदायात क्वचितच सापडतील. मुद्दा एवढाच की हा संप्रदाय दुसऱ्याचा द्वेष करतो अगर त्यांची कमी किंमत समजतो अशी समजूत कोणी करून घेऊ नये. काही वर्षांपासून गोभक्त श्रीचौंडेमहाराज यांच्या प्रयत्नाने सज्जनगडा-वरून श्रीसमर्थांची पालखी आषाढीस पंढरपूरास येते व तिच्या-समोर वारकरी भक्तांची कीर्तनप्रवचने होतात.

(४) **वारकऱ्यांचा आचारविचार**:-वारकऱ्यांचा आचार व विचार हे वर जे आम्ही त्यांचे प्रमाणभूत म्हणून ग्रंथ दिले आहेत त्यावरून

उघड होणारे आहेत. वैदिक धर्मास ज्या ज्या गोष्टी मान्य त्या त्या सर्व बहुतेक अंशी या पंथास मान्य. आपण ज्या वर्णात व आश्रमात आहोत त्या वर्णाश्रमाला योग्य अशी कर्मे प्रत्येक व्यक्तीने अवश्य केली पाहिजेत अशी या पंथातील साधूंची शिकवणूक आहे. परंतु ते घडून कलियुगात व विशेषतः सांप्रतच्या कालात सद्यः भगवत्प्राप्ति होणे अवघड होऊन बसले आहे एवढ्या-करिता या पंथाने त्यास भक्तिमार्गाची व नामस्मरणाची जोड दिली. यांच्या आचारातील मुख्य गोष्ट म्हणजे श्रीपंढरीनाथाची नियमाने दोन वेळा आषाढ शुद्ध व कार्तिक शुद्ध एकादशीस वारी करणे ही होय. कित्येक याशिवाय आणखी माघी व चैत्री याहि एकादशीस पंढरपूरास जातात. कित्येक पंढरपूरास आषाढीस अगर कार्तिकीस एकदाच नियमाने जातात. पण नामदेवराय यांच्या कालापासून मुख्य वाऱ्या म्हटल्या म्हणजे दोनच समजल्या जातात.

**आषाढी कार्तिकी विसरूं नका मज । सांगतसे गुज पांडुरंग ॥** तु. म. १८०३

० ० ०

**आषाढी निकट । आला कार्तिकीचा हाट ॥** तु. म. ३२९

त्यातल्या त्यात आषाढ शुद्ध एकादशीची वारी महत्त्वाची समजली जाते व त्याच वेळेस आळंदी, देहू, त्र्यंबकेश्वर, पैठण वगैरे गावाहून पालख्या येतात. हल्ली निरनिराळ्या ठिकाणाहून पंढरपूरात येणाऱ्या पालख्यांची नोंद शेवटी दिली आहे. वारकरी ज्याप्रमाणे नियमाने पंढरपूरला शुद्ध एकादशीस जातात त्याचप्रमाणे श्रीज्ञानदेव यांच्या समाधीकालापासूनच सर्व वारकरी संप्रदाय कार्तिक वद्य एकादशीस पुणे जिल्ह्यातील इंद्रायणीचे काठी असणारे शिवपीठ जे आळंदी त्याठिकाणी श्रीज्ञानेश्वर माउलीकरिता जमू लागला. त्याच वेळेस संवत्सरग्राम

अथवा सासवड या ठिकाणीही सोपानकाका यांजकरता वैशाख शुद्ध ११ स यात्रा जमू लागली. अलीकडे गेल्या पंचवीस तीस सालापासून मार्गशीर्ष वद्य ११ स म्हणजे त्यांच्या समाधीच्या तिथीसच सासवड येथे यात्रा जमू लागली आहे. पैठणहून शुद्धिपत्र घेतल्यानंतर ज्ञानेश्वर महाराज आपल्या भावंडांसह नेवासे येथे आले व तेथे सच्चिदानंदबाबांना जीवदान देण्याचा चमत्कार घडला. ज्ञानेश्वर महाराजांनी या ठिकाणीच गीतेवरील आपली 'ज्ञानेश्वरी' या नावाने प्रसिद्ध असलेली सुप्रसिद्ध टीका सांगितली व ती सच्चिदानंद बाबाने लिहून घेतली. ती ज्या खांबास टेकून सांगितली तो खांब आज नेवासे येथील मंदिरात आहे. याठिकाणी नुकतेच मंदिराच्या जीर्णोद्धाराचे व भव्य सभामंडप बांधण्याचे काम झाले असून पैठणहून नाथषष्ठीचा उत्सव झाल्यानंतर फाल्गुन वद्य ११ स नेवासे येथे मोठी यात्रा भरत असते.

येथे लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की या पंथात देवाची नेहमी शुद्ध पक्षातील वारी व भक्ताची वद्य पक्षातील वारी आहे. काही वारकरी बाराही महिने पंढरपूर व आळंदीमधील वाट पायाने चालतात व दर शुद्ध व वद्य एकादशीस अनुक्रमे पंढरपूर व आळंदीस हजर राहतात. त्यास 'महिन्याचे वारकरी' असे म्हणतात. तूर्त अशी मंडळी सुमारे पाचशे आहेत. बाकीचा सर्व वारकरी समाज आपापल्या घरचा सर्व उद्योगधंदा करून नियम ठरला असेल त्याप्रमाणे घरचे खाऊन पंढरपूरास व आळंदीस एकदा अगर दोनदा नियमाने जात असतो.

पण नुसता अशा नियमाने पंढरपूरास जाणाराच वारकरी होतो असे नाही. त्याने वारकरी होऊनच पंढरपूरास गेले पाहिजे.

**होय होय वारकरी । पाहे पाहे रे पंढरी ॥** तु. म. ३४२

म्हणजे मुख्य गळ्यात तुळशीची माळ घातली पाहिजे. त्याबरोबरच त्याने गोपीचंदनाचा ऊर्ध्व पुंड्र लावून मुद्रा लाविल्या पाहिजेत. तसेच त्यानें द्वादश टिळेही लाविले पाहिजेत.

**आम्हां अलंकार मुद्रांचे शृंगार। तुळशीचे हार वाहूं कंठीं ॥१॥** तु. म. ११६२

० ० ०

**गोपिचंदन मुद्रा धारणें। आम्हां लेणें वैष्णवां ॥१॥**

**मिरवूं अळंकार लेणें। हीं भूषणें स्वामींची ॥२॥** तु. म. १२४९

त्याचप्रमाणे त्याने पताक (वेळूच्या काठीस भगवे वस्त्र बांधून तयार करतात ती) धारण केली पाहिजे.

**कुंचे पताका झळकती। टाळमृदंग वाजती।**

**आनंदें प्रेमें गर्जती। भद्रजाती विठ्ठलाचे ॥** ज्ञा. म. २०५

परंतु मागे सांगितल्याप्रमाणे वारकऱ्याची एकच मुख्य खूण म्हणजे गळ्यात पवित्र तुळशीच्या एकशे आठ मण्यांची माळ धारण करणे व पंढरीरायाच्या दर्शनास नियमाने जाणे. ही माळ त्यास कोणत्या तरी फडाच्या मुख्याकडून अगर कोणा वारकरी संताकडून घालावी लागते. माळ घालणाऱ्यास सव्वा रुपया अगर तसाच आणखी काही एक खर्च लागत नाही. सामान्यत: माळ घालणाऱ्याने ती विकत आणून ज्या संताकडून ती घालावयाची असेल त्याच्याकडे जावे. संत ती माळ ज्ञानेश्वरीवर ठेवतो व त्यास पंढरपूर व आळंदीची कोणती वारी करणार म्हणून विचारतो. माळ घालणारास कोणती तरी एक वारी अवश्य कबूल करावी लागते. त्यावेळेस त्यास यमनियमाचे जे मूळ परस्त्री, परधन, मांसाहार, मद्यपान यांचा त्याग हा अवश्य पाळला पाहिजे असे सांगण्यात येते. त्याचप्रमाणे त्यास एकादशी–शुद्ध वद्य–बारा महिन्यांच्या अवश्य केल्या पाहिजेत, रोज हरिपाठ म्हटला पाहिजे व ‘रामकृष्णहरि’ असे भजन केले पाहिजे असे सांगितले जाते.

हे सर्व त्याने कबूल केल्यावर ज्ञानेश्वरीवरील माळ उचलून त्याला दिली जाते व 'पुंडलीक वरदा हरिविठ्ठल' या गजरात तो ती आपल्या गळ्यात घालतो. तुळशीची माळ घालून पताका घेऊन नियमाने पंढरीस जाणारा तो वारकरी. वास्तविक पंढरीस पायी जावे असा संतांचा आदेश आहे.

**गात जा गा गात जा गा। प्रेम मागा विठ्ठला ॥** तु. म. ३१८

पण आता वाहनांच्या सोयीमुळे बहुतेक लोक आगगाडीने अथवा मोटारीने जातात. तरी आषाढी एकादशीस पालख्यांच्या बरोबर पायी येणारांची संख्या एक लाखावर असते. अशारितीने पालखीबरोबर अगर गाडीतून पंढरपूरास गेल्यावर तेथील मुख्य करणीय विधी पुढील कडव्यात दिला आहे :—

**चंद्रभागे स्नान विधि तो हरिकथा। समाधान चित्ता सर्वकाळ ॥** तु. म. ३५५

चंद्रभागेत स्नान करावयाचे, श्रीपुंडलीक व श्रीपांडुरंग यांचे दर्शन घ्यावयाचे, नगरप्रदक्षिणा करावयाची व बाकीचा वेळ कीर्तनात व भजनात घालावयाचा, असा पंढरपूरातील मुख्य कार्यक्रम आहे. इतर क्षेत्राप्रमाणे येथे तीर्थोपवास करावा लागत नाही. एवढेच नव्हे तर केल्यास पातक सांगितले आहे. त्याचप्रमाणे येथे श्राद्ध, मुंडण वगैरे काही एक करीत नाहीत. परंतु काही अडाणी लोक हा विधी करतांना येथे दिसतात. पंथाची ज्यास योग्य माहिती आहे ते कोणी करीत नाहीत. ते फक्त नित्य चंद्रभागास्नान, पांडुरंग दर्शन व एकदा देवास नैवेद्य या गोष्टी करतात व बाकी सर्व वेळ वाळवंटात निरनिराळ्या ठिकाणी होणारी कीर्तने व भजने ही ऐकण्यात घालवितात. पंढरपूरास सकाळसंध्याकाळ फडावर कीर्तने होतात व रात्री भजनाचे जागर होतात. मध्यंतरीच्या

वेळात ज्ञानेश्वरीसारखी ग्रंथावर प्रवचने होतात. वारकरी बहुतेक आपापल्या फडावर कीर्तनास जातो. पण दुसऱ्याचे ऐकू नये अशी त्यास बंदी नसते. (फड म्हणजे एका महंताच्या शिष्य मंडळीचा मोठा समुदाय. दिंडी हे लहान भजनीसमूहाचे नाव आहे.) कीर्तन व भजन हेच वारकऱ्यांचे भगवंतास अंकित करण्याचे मुख्य साधन होय.

वारकरी कीर्तन हे हरिदासी कथेहून थोडे भिन्न आहे. वारकरी कीर्तनास निरुपण असे म्हणतात. मान्य असलेल्या एखाद्या साधूचा वैराग्य–कर्म–ज्ञान–भक्तिपर एखादा अभंग घेऊन त्याचा विचार श्रोतृसमुदायापुढे मांडावयाचा व मधून मधून भजन करावयाचे अशी या कीर्तनाची पद्धत आहे.

**भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।**
**प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ।।**
**जेणें करुनी मूर्ति ठसावी अंतरीं श्रीहरीची ।।**
**ऐसी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरची ।।** ए. म. १६७५

या कीर्तनातील विशेष म्हणजे यात आख्यान असे स्वतंत्र नसते. दशमीपासून चतुर्दशीपर्यंत असा सोहळा झाल्यावर पौर्णिमेस सकाळी गोपाळपुरी (पंढरपूराच्या दक्षिणेस एक मैलावर) काल्याचा समारंभ असतो. दिंड्या भजन करीत जातात व तेथील गोपाळकृष्णास काला देऊन लोक आपापल्या घरी परत जातात. घरी गेल्यावर ‘मुरडीव’ म्हणजे कानवले करतात. त्यात हेतु असा असतो की पुन: लवकर देवदर्शनास येण्याचा योग यावा. अशारितीने भोजन केल्यावर देवाचा निरोप घेऊन यात्रा संपली असे समजून वारकरी आपापल्या गावी जातात.

या काल्याच्या बाबतीत फार गैरसमज उत्पन्न होण्यासारखी

विधाने निरनिराळ्या लोकांनी केली आहेत. काल्याच्या वेळी वारकरी एकमेकांच्या तोंडात भाजलेल्या जोंधळ्याच्या लाह्या घालतात. त्याचा अर्थ "वारकऱ्यांत जातीभेद मानीत नाहीत, सर्व एकमेकाच्या पंक्तीस बसतात" असा कित्येक लोक करतात. वास्तविक ही गोष्ट खरी नव्हे. काल्याच्या वेळेस श्रीकृष्णाच्या गोकुळातील बाळलीलापर अभंग घेऊन कीर्तन करून, इतर ठिकाणाप्रमाणे दहिहंडी फोडतात. हा सोहळा झाल्यावर सर्व वारकरी परत आपापल्या गावास जातात.

## ६. वारकऱ्यांचे तत्त्वज्ञान

मागे जी या पंथाच्या आरंभाची व वाढीची चर्चा केली आहे, त्याचप्रमाणे जो या पंथाच्या आचारविचारांचा विचार केला आहे त्यावरून हा पंथ अवैदिक नव्हे अथवा वैदिक धर्माविरुद्ध बंड करणारा नव्हे ही गोष्ट उघड होणारी आहे. काही पुराणमतवादी व काही समाजसुधारक मंडळी यांच्या मते हा पंथ म्हणजे वैदिक धर्माविरुद्ध, विशेषतः त्यात मानलेल्या जातीयव्यवस्थेविरुद्ध एक बंड आहे. परंतु या विधानावरून एवढेच दिसून यते की या मंडळींनी या पंथाचा बाहेरून विचार केला आहे, आत शिरून प्रत्यक्ष माहिती घेऊन हा विचार केलेला नाही. या पंथाचा आद्यमुनि पुंडलीक असून त्याने जी उपासना रूढ केली ती श्रीविठ्ठलाची. श्रीरुक्मिणी–पांडुरंग हे पूर्ण वैदिक दैवत. या पंथाला मान्य असलेल्या संतांनी जे ग्रंथ लिहिले त्यात वेदाची जी स्तुति केली आहे व त्याची प्रमाणभूतता धरली आहे त्यावरून तरी या पंथासंबंधी वर उल्लेखित केलेली मते निराधार आहेत हे उघड दिसून येणार आहे.

मागे पान ८ वर विषयाची थोडी चर्चा आली आहे. तेथे यासंबंधीची संतांची वचने दिली आहेत. म्हणून ती पुन: देत नाही. त्या वचनांवरून वारकरी पंथ हा वेदप्रमाण मानणारा पंथ आहे हे उघड होणार आहे.

येथे इतके मात्र सांगितले पाहिजे की या पंथातील साधूंनी एका दृष्टीने वैदिक धर्मांत सुधारणा केली. पण ती सुधारणा हे वैदिक धर्माविरुद्ध बंड नसून त्याचे उज्वल स्वरूप प्रकट करण्याचा प्रयत्न होय. या चळवळीस वेदविरुद्ध बंड हा शब्दही योग्य नव्हे. कारण, या मंडळींचा वैदिक धर्मांतून बाहेर पडण्याचा अगर वैदिक धर्माचा उच्छेद करण्याचा केव्हाच प्रयत्न नव्हता. या मंडळींनी जाती-विरुद्ध बंड केले याचा अर्थ वाटेल त्या जातीतील माणसांनी वाटेल ते करणे असा नव्हे. असे असते तर कलियुगात अनाचार कसा माजेल हे सांगतांना 'पुढे ब्रह्मघोळ होईल, चारी वर्ण एका ठिकाणी खातील' असे अनाचार-निदर्शक उद्‌गार त्यांनी काढले नसते. त्यांनी जातीच्या विरुद्ध लिहिले म्हणजे 'मुक्तीच्या व भक्तीच्या मार्गांत' जातीला किंमत नाही ही गोष्ट स्पष्टपणे त्यांनी निदर्शनास आणली. कर्ममार्गांत, व्यवहारात जात टाकलीच पाहिजे असे उद्‌गार एकाही संताचे आपणास ऐकू येणार नाहीत. उलट हा कर्ममार्ग कायम राखलाच पाहिजे यावर त्यांनी जोरही दिला आहे. एका विशिष्ट जातीतील विशिष्ट आश्रम धारण करणाऱ्यासच मोक्ष मिळतो ही कल्पना रूढ होत चालली होती. तद्विरुद्ध 'उत्तमापासोनि अंत्यजवरि मुक्तीची सेल मागावी रे रे।' अशी 'मुक्तीची' गवादी या संतांनी घातली. तात्पर्य, कालौघाबरोबर फक्त बाह्य गोष्टीवर जोर देऊन मुक्ति ही एका

विशिष्ट वर्णास व आश्रमास जी मर्यादित केली होती ती या संतांनी सर्वांस मोकळी केली. पण यात ते अवैदिक ठरत नाहीत. कारण, आपल्या शारीरभाष्यात खुद्द शंकराचार्य यांनीही विदुर, धर्मव्याध वगैरे मुक्त होते असे कबूल केले आहे. तेव्हा हेच तत्त्व या संतांनी प्रसृत केले असे म्हणावयास हरकत नाही. हिंदुधर्मातील लोक–पुरुष व स्त्रिया–मुक्त होतीलच असे या संतांनी केले एवढेच नव्हे तर अविंधासही मुक्ति यांनी मोकळी केली.

**सकळांसी येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार हरिनामें ॥** तु. म. ६६४

त्याचाच परिणाम सर्व जातीत–शिंपी, न्हावी, कुंभार, महार वगैरे जातीत सुद्धा–संत निर्माण झाले व महाराष्ट्र हे संतांनी वसविलेले असे स्थान होऊ शकले.

वारकरी ग्रंथाचे व वैदिक धर्माचे नाते कशा स्वरूपाचे होते हे जर पहावयाचे असेल तर हिंदुधर्मांत निर्माण झालेले व वारकरी पंथाप्रमाणे महाराष्ट्रात अनुयायांच्या संख्येने मोठे असणारे जैन, लिंगायत प्रभृति जे धर्म आहेत त्यांच्याशी या पंथाची तुलना करून पहावी. जैन, बौद्ध, लिंगायत यातील पुढाऱ्यांनी वैदिक धर्माचा प्राण जी चातुर्वर्ण्यव्यवस्था तिच्यावर हल्ला केला व आपण स्वतंत्र फड मांडला असे आवर्जून सांगितले. उलट वारकरी पंथातील साधूंनी वैदिक धर्मातील चातुर्वर्ण्य मान्य केले व आपण वैदिक धर्मास उजाळा देण्याकरिता अवतरलो असे सांगितले. या गोष्टीचा खोल विचार केला म्हणजे वारकरी पंथ हा वैदिक धर्मविरुद्ध बंड होय असे म्हणणे कसे अयुक्तिक आहे हे विचारवंतांस पटेल. वारकरी पंथ हा आदिअंती भक्तिप्रधान आहे. परंतु वेदाचा जो 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म नेहनानास्ति किंचन' हा मुख्य सिद्धांत तोच वारकरी संतांचाही सिद्धांत आहे.

हरि व्यापक सर्वगत । हा तंव मुख्यत्वें वेदांत ॥ तु. म. २२७७

० ० ०

विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ॥१॥

० ० ०

जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥४॥ तु. म. २४११

० ० ०

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥ तु. म. २२७१

अशातऱ्हेने हा पंथ अद्वैत मत प्रतिपादन करूनही पुनः भक्तीचे तत्त्व प्रतिपादन करतो. वारकरी पंथाचा विशेष भर असेल तर तो भक्तीवर.

पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ तु. म. २४६१

० ० ०

मुक्तीवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥ तु. म. १०२०

० ० ०

जे पुरुषार्थ सिद्धि चौथी । घेऊनि आपुलां हातीं ॥
रिगाला भक्तिपथीं । जगा देतु ॥ ज्ञाने. १२-२१९

० ० ०

दासीसी अनुसरणें हें तंव लाजिरवाणें मूर्ख ते मुक्ति मागती ॥ ए. म.२५७२

आपल्या अद्वैतपणात किंचितही बिघाड येऊ न देता भक्ति-सुखाचा आनंद उपभोगिता येतो, किंबहुना खरी भक्ति ही अद्वैतातच होते असे शिकविणारा हा पंथ आहे.

शिवो भूत्वा शिवं यजेत् ।

० ० ०

आपणचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्याचें काम ।
मग कीजे कां निस्सीम । सेवा जयाची ॥ ज्ञाने. १८-१५७ ०

अशातऱ्हेने अद्वैतज्ञान प्राप्त करून स्वतः भक्तिसुखाचा आनंद

भोगून इतरांनाही त्या आनंदात भक्तिमार्गद्वारे वाटेकरी करणारा हा पंथ आहे.

या पंथाचे ध्येय सिद्धावस्थेनंतरही कर्मशीलता आहे. ही गोष्ट या पंथातील समाधीच्या कल्पनेवरून स्पष्ट होत आहे. या पंथाने या बाबतीत केवढे कार्य केले आहे हे योगाचे ध्येय व याचे ध्येय यांची तुलना केल्यास आढळून येणार आहे. मुक्तावस्था अथवा तिचा ज्या अवस्थेत अनुभव येतो ती समाधि यांचा संकोचित अर्थ या पंथात नाही. समाधि म्हणजे ताटस्थ्य नव्हे तर–

**व्यापाराचे गाडे । मोडितांहि अपाडे ।**
**अक्रीयेचे न मोडे । पाऊल केंही ।।** अनुभवामृत प्र. ९–२१

० ० ०

**अर्जुना देऊनि निजसमाधी । सर्वेचि घातला महायुद्धी ।।**
**परि तो कृष्ण कृपानिधि । ताटस्थ त्रिशुद्धि नेदीव स्पर्शो।।** ए.भा.२४२४

० ० ०

**समाधि हरीची समसुखेंविण । न साधेल जाण द्वैतबुद्धि ।।** ज्ञा.ह.पा.१३

या साधूंपैकी कोणीही संन्यासवृत्तीचा उपदेश करीत नाही. उलट स्वतः मुक्त बनून आपण ज्या मार्गाने मुक्त झालो त्याचे जगास ज्ञान करून देऊन 'अवघेचि त्रैलोक्य आनंदाचे आवारूं' करण्याचा विश्वव्यापक यत्न करण्यास कास घालावी असा उपदेश या पंथातील साधु करतात.

**पावोनियां ब्रह्मज्ञान । स्वयें तरला आपण ।**
**न करीच दीनोद्धरण । तें भंडपण ज्ञात्याचें ।।** ए. भा. २९–८२१

या साध्य भक्तीस साधनही भक्ति आहे. हा पंथ 'सगुणोपासक' आहे. परमात्मा व्यापक, निर्गुण, निराकार आहे हेंहि त्यास मान्य. पण त्याचप्रमाणे तो सगुणसाकार आहे हेंही तो म्हणतो.

बापरखुमादेवीवरु सगुण निर्गुण । रूप विटेवरी दाविली खूण ॥ ज्ञा.म.१०२

० ० ०

दोन्ही टिपरी एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ॥ तु. म. २११

० ० ०

सगुण निर्गुणाचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ तु. म. ३५१४

० ० ०

निर्गुणीं पावले सगुणीं भजतां । विकल्प धरितां जिव्हा झडे ॥ ए. म.११३१

० ० ०

अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति ।
प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनिया ॥
बीज आणि फळ हरिचें नाम ॥ तु. म. ३९८८

त्या निर्गुण स्वरूपास पावण्याचा मार्ग म्हणजे विहित कर्माचे आचरण, सगुणोपासना, सत्समागम, नामस्मरण व भजन हा होय.

सगुणोपासनेनेच भगवद्विषयक बरवे ज्ञान प्राप्त होते. ज्ञानमार्गाचा व भक्तिमार्गाचा वास्तविक तंटा नाही. उलट भक्ति मोक्षसाधन जे ज्ञान त्यास कशी कारण आहे ही गोष्ट श्रीएकनाथ महाराज यांनी आपल्या अभंगांतून व भागवत अध्याय २ मधून उत्कृष्टरितीने सांगितली आहे. आम्ही येथे फक्त अभंगाचा उतारा देत आहोत. कारण, त्यांत भागवतातील ओव्यांचाही भावार्थ आला आहे :–

भक्तीचें उदरीं जन्मलें ज्ञान । भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥१॥
भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ । वैराग्य केवळ तेथीचें फूल ॥२॥
भक्तिविण ज्ञान गिवसिती वेडे । मूळ नाहीं तेथें फळ केवीं जोडे ॥४॥
भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन । भक्ति माता तया करितसे जतन ॥७॥
एकाजनार्दनी शुद्ध भक्तिक्रिया । ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पायां ॥८॥

ए. भ. २९१२

मनुष्यास स्वाभाविकरित्याच सुलभ गोष्ट पटत असते व कलियुगात लोकांच्या रहाणीत फरक होत जाऊन तपश्चर्यादिक कडक साधने अगर यज्ञयागादिक अत्यंत खर्चाची व बोजड साधने होणे कठीण, हे जाणून या पंथातील साधूंनी भगवद्प्राप्तीकरिता हरिभजनावरच जोर दिला.

**अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कलीं न घडे साधन ।**
**उचित विधिविधान । न कळे न घडे सर्वथा ।।** तु. म. ३२३८

० ० ०

**एक गावें आम्हीं विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां ।।१।।**
**मोडोनिया वाटा सूक्ष्म दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ।।२।।**
**लावूनि मृदंग श्रुति टाळघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ।।३।।**
**तुका म्हणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रे ।।४।।** तु. म. १२२९

० ० ०

**भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे या पापा ।**
**येणें जाणें खेपा । येणेंचि एके खंडती ।।** तु. म. ३२३८

यांच्यामते योगादिक साधनांनी प्राप्त होणारी विकाररहित स्थिति या भजनाच्या साधनाने सुलभरितीने प्राप्त होऊ शकते. कारण, अंतःकरण व इंद्रिये यांचा निवळ निरोध करणे कठीण. हे मानसिक शास्त्रातील तत्त्व लक्षात आणून भक्तिमार्ग हा काम-क्रोधादिकांना 'ठार मारा' असे सांगत नाही, तर त्यांना 'हरिकडे वळवा' असे सांगतो.

**तदर्पिताखिलाचारः सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ।।**
**नारदभक्तिसूत्र ६५**

० ० ०

**इंद्रियें कोंडिलीं न कोंडतीं । विषय सांडितां न सांडिती ।**
**पुढपुढती बांधों येती । यालागी हरिभक्ति द्योतिली वेदें ।।** ए. भा. २-२८६

**एका जनार्दनी गातां हरीचें नाम । निमालीं इंद्रियें विषय विसरलीं काम ॥**
ए. म. १४७७

पण या भजनाससुद्धा नीतीचे नियम पाळणे अवश्य आहे.

**साधनें तरी हींच दोन्हीं । जरी कोणी साधील ॥**
**परद्रव्य परनारी । यांचा धरीं विटाळ ॥** तु. म. ३१०१

थोडक्यात सांगावयाचे की नीतीने वागून श्रीपंढरीरायाची भजनद्वारा उपासना करणारा जो आहे त्यासच अभ्युदय व निःश्रेयस ही दोन्ही प्राप्त होतात असे या पंथाचे मत आहे.

आतापर्यंत या पंथाच्या तत्त्वज्ञानाचा व आचाराचा जो विचार केला त्यावरून 'देश बुडवण्यास' कारण होण्यासारखे त्यात काही नाही ही गोष्ट स्पष्ट दिसून येईल. हा पंथ देश बुडविण्यास कारण होतो असे म्हणणाऱ्यास आम्हास येथे तूर्त एवढेच सांगावयाचे आहे की देशविघातास कारण होणारे 'दैववादासारखे वाद' या पंथातील साधु उपदेशीत नाहीत.

**हाती आहे हित करील तयासी । म्हणोनि ऋषि सांगितलें ॥** तु. म. ३४९२

अशा स्पष्ट शब्दात त्यांचा उपदेश आहे. प्रसंगविशेषी याहि पंथातील लोक राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरिता धारातीर्थी पडलेले आहेत. यातील राष्ट्रकार्याचा व्याप करणाऱ्याचे ठळक उदाहरण पाहिजे असल्यास महादजी शिंदे यांचे देता येईल. शूर पाटीलबुवा हे वारकरी होते, कट्टे ज्ञानेश्वरभक्त होते. त्यांनी 'माधवदासी' नावाचा एक ग्रंथही लिहिलेला आहे. वारकरी असून पाटीलबुवा अलौकिक पराक्रम करू शकले. यावरून हा पंथ देशविघातक नाही ही गोष्ट स्पष्ट होणारी आहे.

याशिवाय या पंथाने (१) अभंग– ओवीद्वारा मराठी भाषेत

अलौकिक ग्रंथसंपत्ति निर्माण करणे. (२) स्त्रीशूद्रचांडाळ या सर्वांस ईश्वरविषयक ज्ञान सुलभ करून देणे, (३) सर्व संग्राहक अशा भागवतधर्माचा पुरस्कार करून ब्राह्मण–ब्राह्मणेतर, शैव-वैष्णव वगैरे सारख्या देशविघातक वादाचे बीज नाहीसे करणे, (४) परकीय धर्मास तोंड देण्यास समाज सुसंघटित करणे इत्यादि कामगिरी केली आहे. मुसलमानांचे महाराष्ट्रावर जोराचे आक्रमण होत असतांना महाराष्ट्रात वैदिक संस्कृति टिकविण्यास या पंथाने मोठा हातभार लावला आहे हे या पंथाच्या इतिहासावरून स्पष्ट दिसून येईल.

तात्पर्य, कालास अनुसरून सर्वांचा संग्रह करणारा व परमेश्वर-प्राप्तीचा सरळ व सुलभ मार्ग दाखविणारा असा हा पंथ आहे. दिवसेंदिवस याची वाढ खूपच जोराने होत आहे व हे श्रीपांडुरंगभक्तीचे श्रीपुंडलीकाने लावलेले ‘ इवलेसें रोप ’ श्रीज्ञानोबा–तुकोबा आदिकरून संतमंडळींच्या कृपारूप ओलाव्याने ‘ गगनावर जाईल ’ अशी चिन्हे दिसत आहेत.



# ७. वारकरी संत

| नाव | काल शके | | समाधिस्थान |
|---|---|---|---|
| निवृत्तिनाथ | ११९५–१२१९ | | त्र्यंबकेश्वर |
| ज्ञानेश्वरमहाराज | ११९७–१२१८ | | आळंदी |
| सोपानदेव | ११९९–१२१८ | | सासवड |
| मुक्ताबाई | १२०१–१२१९ | | एदलाबाद |
| विसोबा खेचर | ... | १२३१ | औंढनागनाथ |
| नामदेव | ११९२–१२७२ | | पंढरपूर |
| गोरा कुंभार | ११८९–१२३९ | | तेर |
| सांवतामाळी | ... | १२१७ | अरणभेंडी |
| नरहरी सोनार | ... | १२३५ | पंढरपूर |
| चोखामेळा | ... | १२६० | पंढरपूर |
| जगमित्र नागा | ... | १२५२ | परळी (वैजनाथ) |
| कूर्मदास | १२५३ | ... | लऊळ |
| जनाबाई | ... | १२७२ | पंढरपूर |
| चांगदेव | ... | १२२७ | पुणतांबे |
| भानुदास | १३७० | ... | पैठण |
| एकनाथ | १४७०–१५२१ | | पैठण |
| राघवचैतन्य | ... | ... | आळंदगुंजोटी |
| केशवचैतन्य | ... | १३९३ | ओतूर |
| बाबाजीचैतन्य | ... | ... | मन्याहाळ |
| तुकारामबुवा | ... | १५७२ | देहू |
| निळोबाराय | ... | ... | पिंपळनेर |
| बोधलेबुवा | ... | ... | धामणगाव |
| शंकरस्वामी | ... | ... | शिऊर |
| मल्लाप्पा | ... | ... | आळंदी |
| मुकुंदराज | ... | ... | आंबे (जोगाईचे) |
| कान्होपात्रा | ... | ... | पंढरपूर |
| जोगापरमानंद | ... | ... | बार्शी |

———

# ८. पालख्यांच्या

| क्रमांक | पालखीचे नाव | कोठून निघते | |
|---|---|---|---|
| १ | ज्ञानेश्वर महाराज | आळंदी | जि. पुणे |
| २ | तुकाराम महाराज | देहू | ,, |
| ३ | लक्ष्मीनारायण | सासवड | ,, |
| ४ | सोपानदेव महाराज | सासवड | ,, |
| ५ | मच्छिंद्रनाथ महाराज | मच्छिंद्रगड | जि. सातारा |
| ६ | जयरामस्वामी महाराज | वडगाव | ,, |
| ७ | तुकाराम पादुका | सातारा | ,, |
| ८ | घाडगे महाराज | कोळे | ,, |
| ९ | शेकूबुवा महाराज | शिरसवड | ,, |
| १० | रामखंड | गजवाडी | ,, |
| ११ | बलभीम महाराज | साडे | जि. सोलापूर |
| १२ | तपकीरबुवा | चिंचगाव | ,, |
| १३ | निवृत्तिनाथ महाराज | त्रिंबक | जि. नासिक |
| १४ | मुक्ताबाई (राम) | जळगाव | जि. जळगाव |
| १५ | मुक्ताबाई | एदलाबाद | ,, |
| १६ | एकनाथ महाराज | पैठण | औरंगाबाद |
| १७ | जनार्दनस्वामी | औरंगाबाद | |
| १८ | शंकर महाराज | माहुली (अमरावती) | |
| १९ | रखमाबाई | कौंडिण्यपूर (अमरावती) | |
| २० | वंकटस्वामी | निनगूर जि. बीड | |

**टीप** :— वरील पालख्यांशिवाय अलीकडे समर्थ रामदासस्वामी (सज्जनगड जि. सातारा), दामाजीपंत (मंगळवेढे जि. सोलापूर), सांवतामाळी (अरण जि. सोलापूर), भूतेश्वर (नागपूर), बंका (मेहुणपुरा जि. सोलापूर) यांच्या पालख्या पंढरपूरला येतात. नामदेव महाराज, नरहरी सोनार, रोहिदास, संताबाई व चोखोबा यांच्या पालख्या पंढरपुरांतच निघतात.

# माहितीचा तक्ता

| केव्हा निघते | केव्हा पोहोचते | परत केव्हा निघते | मुक्कामास केव्हा पोहोचते |
| --- | --- | --- | --- |
| ज्येष्ठ व॥ ८ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ९ |
| ज्येष्ठ व॥ ८ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ११ |
| ज्येष्ठ व॥ १२ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ११ |
| ज्येष्ठ व॥ १२ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ५ |
| ज्येष्ठ व॥ ३० | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ११ |
| आषाढ शु॥ ३ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ५ |
| आषाढ शु॥ १ | आषाढ शु॥ १० | आषाढ व॥ १ | आषाढ व॥ ४ |
| ज्येष्ठ व॥ ११ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १२ | आषाढ व॥ ८ |
| आषाढ शु॥ ४ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ३ |
| ज्येष्ठ व॥ १४ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ८ |
| आषाढ शु॥ ४ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १२ | आषाढ व॥ २ |
| आषाढ शु॥ ७ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १२ | आषाढ शु॥ १३ |
| ज्येष्ठ शु॥ १४ | आषाढ शु॥ १० | आषाढ व॥ १ | श्रावण शु॥ ४ |
| ज्येष्ठ शु॥ १५ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | श्रावण शु॥ १३ |
| ज्येष्ठ शु॥ ७ | आषाढ शु॥ ४ | आषाढ शु॥ १५ | श्रावण शु॥ १२ |
| ज्येष्ठ व॥ ७ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ११ |
| ज्येष्ठ व॥ १ | आषाढ शु॥ १० | आषाढ शु॥ १५ | आषाढ व॥ ३० |
| ज्येष्ठ शु॥ ८ | आषाढ शु॥ ४ | आषाढ शु॥ १५ | श्रावण शु॥ ६ |
| ज्येष्ठ शु॥ १ | आषाढ शु॥ ८ | आषाढ व॥ १ | श्रावण व॥ ६ |
| कार्तिक शु॥ २ | कार्तिक शु॥ १० | कार्तिक शु॥ १५ | मार्गशीर्ष शु॥ ५ |

## ९. ज्ञानेश्वर महाराज पालखी सोहळ्यातील दिंड्या

| क्र. | दिंडी क्र. | दिंड्यांचे नाव | क्र. | दिंडी क्र. | दिंड्यांचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री ज्ञानेश्वर म. दिंडी | २३ | १४ | भोपळे दिंडी |
| २ | अ | आळंदीकर | २४ | १५ | नांदेडकर दिंडी |
| ३ | आ | लिमराज महाराज | २५ | १६ | निकम दिंडी |
| ४ | इ | वासकरमहाराज | २६ | १७ | चाकणकर |
| | | तात्यासो. वासकर | २७ | १८ | माई दिंडी |
| | | विवेकानंद वासकर | २८ | १९ | मोरकर दिंडी |
| ५ | ई | हैबतरावबाबा | २९ | २० | रोकडोबादादा दिंडी |
| ६ | उ | सरदार शितोळे | ३० | २१ | घोरपडे सातारकर |
| ७ | २ | खंडूजीबाबा दिंडी | ३१ | २२ | वडगावकर |
| ८ | अ | निवृत्तीबुवा राजुरकर | ३२ | २३ | दुधीकर |
| ९ | ३ | शेडगेबाई | ३३ | २४ | रोहीदास दिंडी |
| १० | ४ | शेडगे पंच मंडळी | ३४ | २५ | चोखामेळा दिंडी |
| ११ | ५ | दौलतबुवा आंधळे | ३५ | २६ | अजामेळा दिंडी. |
| १२ | ६ | जळगावकर | ३६ | २७ | भोई समाज दिंडी |
| १३ | ७ | जनार्दन वासकर | | | **रथामागील दिंड्या** |
| १४ | ८ | डांगे दिंडी | ३७ | १ | खडकतकर |
| १५ | ९ | गोविंदराव भोई | ३८ | २ | टेंभुकर दिंडी |
| १६ | १० | भगवानबुवा कराडकर | ३९ | ३ | भानुदास टेंभुरकर दिंडी |
| १७ | अ | भानुदासबुवा कराडकर | ४० | ४ | उखळीकर दिंडी |
| १८ | ब | एकनाथबुवा कराडकर | ४१ | ५ | विठोबा उध्वळीकर |
| १९ | क | पंढरीनाथ कराडकर | ४२ | ६ | गुरुजीबुवा दिंडी |
| २० | ११ | सोपानकाका कराडकर | ४३ | ७ | बाबासो. आजरेकर दिंडी |
| २१ | १२ | मारोतीबुवा कराडकर | ४४ | ८ | घोराडकर दिंडी |
| २२ | १३ | बापु तांबट (शिरवळकर) | ४५ | ९ | संभू घोराडकर दिंडी |

| क्र. | दिंडी क्र. | दिंड्यांचे नाव | क्र. | दिंडी क्र. | दिंड्यांचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| ४६ | १० | वालूबाई दिंडी | ७१ | ३४ | विश्वस्त सांप्रदाय दिंडी |
| ४७ | ११ | गोऱ्हेकर दिंडी | ७२ | ३५ | कोकण विभाग दिंडी |
| ४८ | अ | ढवळीकर दिंडी | ७३ | ३६ | वैजीनाथ वारकरी दिंडी |
| ४९ | १२ | गवंडी दिंडी | ७४ | ३७ | मुकुंदराज स्वामी दिंडी |
| ५० | १३ | वाईकर | ७५ | ३८ | पुंडलीकराय दिंडी |
| ५१ | १४ | अमरावतीकर विठ्ठलानंद स. | ७६ | ३९ | मावळ विभाग दिंडी |
| ५२ | १५ | वालूरकर दिंडी | ७७ | ४० | धाकटा वामन दिंडी |
| ५३ | १६ | लोहोगावकर ठाकुरबुवा | ७८ | ४१ | सखाहरी कृष्णा वैकुंठे |
| ५४ | १७ | भेंडुजीबुवा दिंडी | ७९ | ४२ | हरिहर महाराज दिंडी |
| ५५ | १८ | चिचघरकर दिंडी | ८० | ४३ | गोविंद महाराज केन्द्रे |
| ५६ | १९ | गाडगेमहाराज | ८१ | ४४ | सदानंद महाराज दिंडी |
| ५७ | २० | फुरसुंगीकर | ८२ | ४५ | माहेश्वरी दिंडी |
| ५८ | २१ | धोंडोपंत दादा | ८३ | ४६ | आबा आगळे दिंडी |
| ५९ | २२ | गयाबाई बेलापूरकर | ८४ | ४७ | बारागाव भजनी मंडळ |
| ६० | २३ | आजरेकर दिंडी | ८५ | ४८ | रंगनाथ महा. परभणीकर |
| ६१ | २४ | गुणाजीबुवा दिन्डी | ८६ | ४९ | मरोतीराव महा. (फटा.) |
| ६२ | २५ | भिमाशंकर मंगळवेढेकर | ८७ | ५० | मुकुंदस्वामी दिंडी |
| ६३ | २६ | आंबेकर आजरेकर | ८८ | ५१ | वेतावती सितामाई दिंडी |
| ६४ | २७ | विष्णुसेवा मंडळ | ८९ | ५२ | दत्तु गिलभीरे |
| ६५ | २८ | साहेबराव रणवरे | ९० | ५३ | बरूड समाज |
| ६६ | २९ | जामकर | ९१ | ५४ | नरहरी सोनार दिंडी |
| ६७ | ३० | दादामहाराज सातारकर | ९२ | ५५ | निजानंद चैतन्य |
| ६८ | ३१ | मुंबईकर दिंडी | ९३ | ५६ | विठ्ठल तारे |
| ६९ | ३२ | संभा माने दिंडी | ९४ | ५७ | कैलास वारकरी |
| ७० | ३३ | माळशिरसकरीण दिंडी | ९५ | ५८ | शांताराम गुरुजी दिंडी |

| क्र. | दिंडी क्र. | दिंड्यांचे नाव |
|---|---|---|
| ९६ | ५९ | मुक्ताबाई बेळगावकर |
| ९७ | ६० | कळवा बेलापूर विभाग |
| ९८ | ६१ | भगवान सांप्रदायीक दिंडी |
| ९९ | ६२ | बंकटस्वामी |
| १०० | ६३ | हनुमानदास महाराज |
| १०१ | ६४ | महाजनी महाराज |
| १०२ | ६५ | मारोती महा. (कंदरे) |
| १०३ | ६६ | नाशिक विभाग दिंडी |
| १०४ | ६७ | विश्वनाथबुवा गलांडे |
| १०५ | ६८ | कैलास महामुनी |
| १०६ | ६९ | जोग महाराज दिंडी |
| १०७ | ७० | बाळकृष्ण बालवडकर |
| १०८ | ७१ | शामसुंदर केंद्रे |
| १०९ | ७२ | रमेश ठाणेकर |
| ११० | ७३ | गीता हरीपाठ आश्रम |
| १११ | ७४ | सोपान कदम |
| ११२ | ७५ | मारोती महाराज (भेंड्याजी) |
| ११३ | ७६ | राजाराम सुखर |
| ११४ | ७७ | ज्ञानोबा माऊली बोराटे |
| ११५ | ७८ | विज्ञानेश्वर आपेगाव |
| ११६ | ७९ | मदन महाराज बीहाणी |
| ११७ | ८० | सावता आश्रम |
| ११८ | ८१ | महादेवबुवा अहीर |
| ११९ | ८२ | वामनानंद चैतन्य |
| १२० | ८३ | मोजलींगकाकास लाळोजी भळोजी |
| १२१ | ८४ | जनार्दन स्वामी चौधरी |
| १२२ | ८५ | खंडाळा ता. दिंडी (धायगुडे) |
| १२३ | ८६ | ज्ञा. मा. वाडळेसमाज |
| १२४ | ८७ | बापूराव पाटील कोल्हापूरकर |
| १२५ | ८८ | वेल्हा तालुका दिंडी |
| १२६ | ८९ | महाराष्ट्र वारकरी सेवा मंडळ |
| १२७ | ९० | त्र्यंबकेश्वर दिंडी |
| १२८ | ९१ | अहिल्यादेवी दिंडी |
| १२९ | ९२ | ज्ञानेश्वर सांप्रदाय मंडळ (पिंपरेखुर्द) |
| १३० | ९३ | निवृत्तीबुवा दगडू भगत (पैठणकर) |
| १३१ | ९४ | विठ्ठल बापू सबलस |
| १३२ | ९५ | साहेबराव नाना वारकरी |
| १३३ | ९६ | मुळशी तालुका दिंडी |
| १३४ | ९७ | क्षत्रीय मराठा समाज |
| १३५ | ९८ | ज्योर्तीलींग दिंडी |
| १३६ | ९९ | श्रीराम दिंडी सोहळा |
| १३७ | १०० | विठ्ठल सेवा मंडळ |

| क्र. | दिंडी | दिंड्यांचे नाव |
|---|---|---|
| १३८ | १०१ | ह. भ. प. जयराम महाराज दिंडी सिद्धबेट |

## महाराष्ट्रातून वेगवेगळ्या ठिकाणाहून पंढरपूर येथे येणाऱ्या दिंड्या

१) श्रीहनुमान दिंडी नागपूर
२) रामनाथ स्वामी दिंडी वाढोणा
३) नारायण गुरु दिंडी कारंजा
४) गुलाबराव महाराज चांदुरबाजार
५) श्रीगजाननमहाराज शेगाव
६) किसनगिरीबाबा दिंडी देवगड
७) भास्करमहाराज दिंडी आडगाव
८) नेवासकर दिंडी नेवासा
९) काळेमहाराज दिंडी नेवासा
१०) जळगावकर दिंडी
११) येडशीकर भगवान बोवा
१२) येडशीकर रामकृष्ण बोवा
१३) मामासाहेब दांडेकर दिंडी बेळगाव
१४) अ चैतन्य महाराज पालखी ओतूर
व चैतन्यमहाराज पालखी ओतूर



# पसायदान

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।।

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ।।

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।।

वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळी । भेटतु भूतां ।।

चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।।

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।।

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ।।

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।।

येथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ।।

ज्ञाने. १८-१७९३ ते १८०१

---



*वारकरी पंथाला उज्वलता देणारे थोर प्रचारक*
*ह.भ.प.प्रा.शं.वा. तथा मामासाहेब दांडेकर*

## वारकरी प्रकाशन मंडळ, नागपूर

- वारकरी भजनमाला संग्रह
- श्री तुकाराम महाराज गाथा
- श्री ज्ञानेश्वरी पारायण प्रत
- हरिपाठ
- जोगमहाराज चरित्र
- श्री ज्ञानेश्वर महाराज चरित्र व तत्त्वज्ञान
- वारकरी पंथाचा इतिहास

**आगामी प्रकाशने**

- साक्षात्कार

### पुस्तके मिळण्याची ठिकाणे

- श्री तुकाराम बुक डेपो, मुंबई
- श्री सेंट्रल बुक डेपो, मुंबई
- जगदीश्वर बुक डेपो, मुंबई
- ज्ञानेश्वर बुक डेपो, पंढरपूर
- शारदा पुस्तक भांडार, पंढरपूर
- विठ्ठल ग्रंथ भांडार, पंढरपूर
- स.के. पदम बुक डेपो, पंढरपूर
- रामेश्वर ग्रंथ भांडार, पंढरपूर
- देविदास धर्मशाळा, आळंदी
- दत्त बुक डेपो, आळंदी
- गुजर बुक सेलर्स, आळंदी
- ज्ञानेश्वर मंदीर, नागपूर